ाय, पर्व-
ालय मुळें
ी इच्छा
रूं इच्छि-
हेती नसते
ा किल्येक
ासोपयोगी
प्रस्तुतचें
माहितीचें
ां मजकडे
घेतल्याची
पुस्तकाची



ाक लवकर प्रसिद्ध करण्याच्या बाबतींत ज्या माझ्या ानीं मला विशेष उत्साह दाखविला त्यांचा मी आभारी आहे.

ो. गोव्याचा प्रवास करूं इच्छिणाऱ्या लोकांसाठीं हा प्रयत्न कितपत यशस्वी झाला आहे हें पहाण्याचें ाचकांवरच संपवून व पुढील आवृत्तीच्या वेळीं यांत ी पुष्कळ उपयुक्त माहितीची भर घालण्याचें अभिवचन हे दोन शब्द आटोपते घेतों.

ाण ( गोवा )
१ जानेवारी १९३० } लेखक

—०—

॥ श्रीराम समर्थ ॥

# गोव्याचा माहितगार.

## १ गोवा प्रांत.

गोवा प्रांत १२१३ चौरस मैल असून जवळ जवळ साडेपांच लाख वसतीचा आहे. या प्रांताच्या पूर्वेस बेळगांव जिल्हा व उत्तरकानडा, पश्चिमेस हिंदी महासागर, दक्षिणेस कारवार जिल्हा व उत्तरेस सावंतवाडी संस्थान अशीं आहेत. सावंतवाडी संस्थानच्या हद्दीपासून कारवार जिल्ह्याच्या सीमेपर्यंत गोव्याची लांबी ६३ मैल असून बेळगांव जिल्ह्यापासून हिन्दीमहासारापर्यंत रुंदी ३६ मैल आहे. गोव्याचा एकंदर टापू सुपीक व हवा आरोग्यकारक आहे. गोमंतकचें सृष्टिसौंदर्य अपूर्व-म्हणूनच प्रेक्षणीय आहे. गोव्याचीं देवालयें फार सुरेख व सुप्रसिद्ध आहेत.

## २ गोव्याचा त्रोटक इतिहास.

अगदीं प्राचीनकाळीं क्षत्रिय पापविमोचनार्थ यज्ञ करण्यासाठीं श्रीपरशुरामानें समुद्रापासून जी जमीन घेतली, तींतच गोमंतकाचाहि समावेश होतो. पुढें यज्ञाचें काम संपूर्ण होतांच ती सर्व जमीन, यज्ञकार्यासाठीं सरस्वती नदीतीरावरून इकडे आणलेल्या पंचगौडांतर्गत दहा सारस्वत ब्राम्हणांना श्रीपरशुरामानें दान दिली अशी माहिती मिळते. अर्थात् गोव्याचे मालक किंवा पहिले राज्यकर्ते हेच ब्राम्हण

होते. या ब्राम्हणांची म्हणजे गोव्याची पहिली राजधानी 'मठग्राम' शहरीं होती. हल्लीं गोव्याच्या ज्या एका प्रसिद्ध शहराला आम्हीं 'मडगांव' या नांवानें संबोधतों त्यालाच पूर्वी गोमंतकच्या पहिल्या राजधानीचा मान मिळाला होता.

गोव्याचे दुसरे राजे कदंबवंशीय झाले, व त्यानंतर शालिवाहनाकडे गोमंतकचीं राज्यसूत्रें गेलीं. गोव्याचे ४ थे राज्यकर्ते चालुक्यवंशीय झाले. यांची राजधानी बदामी-शहरीं होतीं. पुढें कलभूर्यवंशी महामंडलेश्वरानें चालुक्याला जिंकल्यानें गोवा त्यांच्या हातीं गेलें. गोव्याचे ६ वे राज्यकर्ते बसव्वा ब्राम्हण झाले. गोव्यांत कानडी भाषेचा प्रसार यांच्याच राजवटींत झाला. पुढें राष्ट्रकूट घराण्याकडे गोव्याची सत्ता जावून हे गोव्याचे सातवे राज्यकर्ते बनले. यांची मुख्य राजधानी मालखेड येथें होती. यानंतर चालुक्यवंशांतील विक्रमादित्यानें गोवा काबीज केला, परंतु पुढें त्याकडून तो होयखल बल्लाळनें घेतला. गोव्याचे दहावे राज्यकर्ते कदंबवंशीय जयकेशी हे झाले. यांनीं आपली गादी अकराव्या शतकांत 'गोपकपट्टण' (व्हडलें गोंय) येथें स्थापन केली. यांकडून गोवा देवगिरीच्या राजांकडे गेला व इ. स. १३१८ त अल्लाउद्दीन खिलजीनें गोमंतक सर केल्यामुळें तो दिल्लीपतपातशाहींत सामील झाला. यांची कारकीर्द प्रजेला भयंकर जाचक झाली.

इ. स. १३६५ त विजयनगरच्या हिंदू राजांनीं गोवा काबीज केला; व यावेळीं प्रजा फार संतुष्ट झाली. पुढें

कलबुर्गाधिपतीकडे गोमंतक जाऊन नंतर आदिलशाहींत आला. यावेळीं गोव्याची राजधानी फोंडें येथें होती. इ. स. १५१० त गोवा शहर पोर्तुगीजांच्या ताब्यांत आलें. परंतु यावेळीं गोव्याचा बराच भाग श्रीशिवाजीमहाराजांकडे होता व तो व्यवस्थेसाठीं त्यांनीं वाडकरांकडे संपविलेला होता. पुढें तो भाग विजापूरकरांनीं घेऊन कांहीं अटींवर सौंधेकरांस दिला. कांहीं कालानें सौंधेकरांचें बल कमी पडल्यावर व हैदरअल्लीच्या त्रासास कंटाळून सौंधेकरांनीं आपल्या ताब्यांतील सर्व भाग वार्षिक ४८०० रु. च्या वेतनावर व्यवस्थेसाठीं पोर्तुगीजांकडे संपवला.

गोव्याचे २० वे राज्यकर्ते पेशवे झाले. यांनीं मडगांव, म्हापशें, फोंडें हे भाग पोर्तुगिजांकडून लढाईत जिंकले होते; यानंतर पेशव्यांचें बल कमी पडून त्यांच्या ताब्यांतील गोमंतकीय सर्व भाग पुनः पोर्तुगिजांनीं सर केला.

पोर्तुगिजांची गोव्यांतील पहिली राजधानी 'जुना-गोवा व दुसरी 'नवा-गोवा' म्ह. पणजी अशा आहेत. गोव्याची तूर्तची राजधानीहि पणजीच होय.

## ३ गोव्याचीं प्रवेशद्वारें

गोव्यांत येण्याच्या मुख्य बाजू दोन आहेत. पहिली रेलवेची व दुसरी आगबोटींची. शिवाय सांखळी, दोडामार्ग, आरावंदें, जून--सांगें, धारबांदिवडें, पोळें--काणकोण, न्हयबाग वगैरे पायमार्गाहे आहेत.

सदर्न मराठा रेलवेच्या लोंडा जंक्शनपासून कॅसलरॉकच्या बाजूनें गोव्यांत प्रवेशणारा W.I.P, ( वेस्टइंडिया पोर्तुगीज ) रेलवेचा फाटा हा गोव्यांत येणाऱ्या प्रवाशांस जास्त सोयीस्कर आहे. कॅसलरॉकपासून मुर्गांव–हरबर या गोमंतकच्या प्रमूख व प्रसिद्ध धक्क्यापर्यंत ५४ मैल लांबीची ही रेलवे आहे. कॅसलरॉकन्नतरचें पहिलें स्टेशन करंजोळ हें गोव्याच्या हद्दींतलें आहे. ही रेलवे सह्याद्रीपर्वताच्या आंतून गेलेली असल्यानें या डोंगरांत असलेले ह्या रेलवेचे बारा बोगदे फार मजेदार आहेत. त्यांत ८ व १० ह्या नंबरांचे बोगदे सर्वांत मोठे आहेत. ही रेलवे इ.स. १८८८ सालीं सुरू झाली.

### W.I.P. रेलवेचीं गोमन्तकीय स्टेशनें

करंजोळ, दुधसागर, सोनाळी, कुळें, कालें, सांवर्डे, चांदर, मडगांव, माजोर्डा, कांसावली, दाबोली, वास्को व हरबर.

**करंजोळ** स्टेशन करंजोळ गांवांसाठीं असून या स्टेशनापासून दुधसागर ३। मैल आहे व गोव्याच्या पूर्वहद्दीपासून ६॥ मैल आहे. **दुधसागर** स्टेशन दुधसागर खेडयासाठीं आहे. येथून पुढील स्टेशन **सोनाळी** २ मैल आहे. सोनाळींहून **कुळें** स्टेशन ५॥ मैल असून हें स्टेशन कुळें, मलें, सांकोर्डे, सूर्ले ( सत्तरचा एक भाग ) ह्या गांवांना जाण्यास सोयीचें आहे, कुळ्याहून **'कालें'** स्टेशन ४॥ मैल असून कालें, कस्टी इ. गांवांसाठीं हें स्टेशन आहे. कालें

स्टेशनपासून **सांवर्डें** ( कुडचडें ) स्टेशन ६।। मैल असून येथून सांवर्डें, कुडचडें, सांगें, केंपें, जांबावली, रिवण व वाफोरवरून फोंडें महालांत जाणाऱ्या लोकांना सोयीचें असतें. सांवर्डेंहून वाफर ( बोट ) पणजीपर्यंत जात असल्यानें त्या भागाचे कांहीं लोकहि येथें उतरत असतात. सांवर्डेंहून **चांदर** स्टेशन ४।। मैल असून येथून कुडतरी, चांदर, पारोडें, पर्वत, असोळडें, कोटंबी या गांवाना जाणें सोयीचें असतें. चांदरहून **मडगांव** स्टेशन ५।। मैल असून येथून मडगांव शहर, कोलवें, बाणावली, कुट्ठाळी, नावेली, वारकें, करमणें, ओडली, कुंकळ्ळी, असोळणें इ. साष्टींतील गांवें व बाळ्ळी, काणकोण, पर्तगाळ व पुढें कारवारपर्यंत जाण्यास येथून सोयीस्कर असतें, मोटारमधून काणकोण, पर्तगाळ, कारवारकडे जाणारे लोक येथेंच उतरतात. मडगांवहून **माजोर्डा** स्टेशन ४ मैल व तेथून **कांसावली** स्टेशन ३ मैल आहे. कांसावलीहून वेळसांव, सांकवाळ हीं गांवें जवळ आहेत. कांसावलीपासून **दाबोली** स्टेशन ४।। मैल असून तें दाबोलीगांवांकरतां आहे. दाबोलीहून **वास्को** स्टेशन ३ मैल असून मुर्गांव तालुक्याचें मुख्य शहर हेंच होय. वास्कोहून **हारबर** २।। मैल आहे. हारबरला रेलवे संपते. कारवार, मंगलोर, कोंकणप्रांत, मुंबई व परदेशीं बोटीमधून जाणारे लोक या स्टेशनवर उतरतात.

## ५ बोटी

मुंबईहून अलिबाग, रेवदंडा, जंजिरा, श्रीवर्धन, बाणकोट, हरणई, दाभोळ, जयगड, रत्नागिरी, जयतापूर, विजयदुर्ग,

देवगड, मालवण, वेंगुर्लें, मोर्जी अशीं बंदरें करीत निघणारी बोट नेहमीं सकाळीं ७ ते ९ च्या दरम्यान **पणजी** येथें येते. पणजी हें गोव्याच्या राजधानीचें शहर आहे. मुंबईहून पणजी २४४ मैल असून हें अंतर तुडविण्यास बोटीस २४ ते २७ तास लागतात. तसेंच मुंबईहून मोठीं बंदरें करीत निघणारी व थेट कारवार, मंगलोरकडे जाणारी बोट जातांना व येतांना मुरगांव-हारबर हें बंदर करते. मुंबईहून मुरगांव-हारबर २५२ मैल असून बोटीस २८ तास लागतात. शिवाय मुर्गांवला आफ्रिका, युरोप वगैरे भागांतून मालाच्या व उतारूंच्या मोठमोठ्या बोटी येत असतात. मुंबईहून पणजीस येणाऱ्या बोटी दरसाल सप्टेंबरच्या आरंभीं सुरू होऊन मे अखेर बंद होतात. मुर्गांव लायनीच्या मोठ्या बोटी मात्र सबंध वर्षांत दर आठवड्याला सारख्या येत जात असतात. वादळ जास्त असलें म्हणजे मात्र एखादेवेळीं त्यांचा टाईम चुकतो.

## ६ गोव्यांत येण्याचे मुख्य पायरस्ते.

गोव्यांत येण्याचे मुख्य पायरस्ते तीन आहेत. पहिला आरवंद्याकडील किरपाणी येथून पेडण्याकडे आलेला, दुसरा सदाशिवगडावरून काणकोणकडे आलेला व तिसरा तिनैघाटाहून आलेला. याच रस्त्यानें बेळगांवहून थेट पणजीपर्यंत हल्लीं मोटारसर्व्हिस सुरू झाली आहे याशिवाय सांखळी, दोडा मार्ग इ. रस्ते आहेत.

## ७ गोव्यांत प्रवेश करण्याच्या डोंगरी वाटा.

**सत्तर महाल**—रामघाट, अणेघाट, बोरघाट, केळघाट.

**सांगें तालुका**—तिनैघाट, ब्रागासघाट, दिगीघाट, कुंडलघाट, व दोंकरपेंघाट.

## ८ गोव्यांतील वाफर ( बोटी )

**सांवर्डें ते पणजी, पणजी ते पिळगांव** व **वळवै, पणजी ते हळदोणें,** व **पणजी ते मुर्गांव** अशा चार बाजूंनीं या वाफरांची रहदारी सुरू असते. तसेंच **पणजी-बेतीं-वेरें** या बंदरांत एकेक तासाच्या अवधीनें तरीचे वाफर येत जात असतात. हे लोकल लाँच आहेत.

सांवर्डेंपासून निघणारा वाफर सकाळच्या आठांला ( लोंढ्याची गाडी आल्यानंतर तीवरील पॅसेंजरांना घेऊन ) सुटतो. हा वाफर माणकें ( येथून कुडतरी गांव जवळ आहे. राजतूर येथून मडगांव तालुक्याचा भाग व शिरोडें गांव जवळ आहे. बोरी (बोरी गांव); दुर्भाट (दुर्भाट गांव, वाडी, कवळें, बांदिवडें, रामनाथ, फोंडें तालुक्याचें मुख्य शहर व या तालुक्याच्या खंडेपार वगैरे भागांत जाणाऱ्यांस सोयीचें आहे) उंड ( येथून बांदिवडें गांव जवळ आहे ); मडकई; डोंगरी; कुंडई ( कुंडई गांव, म्हाडदोळ, प्रियोळ, वेलींग अशा गांवांना जाण्यास हें बंदर सोयीस्कर आहे ); कुंभारजुवें ( येथून म्हासेल, खडोळें हीं गांवें जवळ आहेत. ) जुनें गोवें ( गोव्याची जुनी राजधानी ); रायबंदर, ही बंदरें करीत संध्याकाळीं २ ते ३ वाजण्याच्या सुमारास पणजीस पोंचतो.

**पणजी ते वळवै**---हा वाफर पणजीहून संध्याकाळीं निघून रायबंदर, जुना गोवा, पिळगांव (येथून नार्वे, डिचोली, सांखळी या गांवीं व सत्तर महालांत जाणें सोयीचें असतें. ); सावई अशीं बंदरें करीत वळवैला जातो व रात्रीं तेथें राहून सकाळीं पणजीस येण्यास परततो.

**पणजी ते हळदोणें**—बिठोण इ. बंदरें करीत हा वाफर हणदोणेपर्यंत जातो. ( हळदोण्याहून अस्नोडें, शिरगांव इ. गांवें जवळ आहेत ).

**पणजी ते मुर्गांव**--पणजीहून मुर्गांवला जाणारा वाफर पहांटेस ४॥ व दुपारीं १॥ वाजतां, पणजीहून; वेरें व दोना-पाऊल हीं बंदरें करीत दर दिवसाला दोन खेपा मुर्गांवला जातो व दोन्हीं वेळीं लोंडयाच्या गाडीवरील उतारू घेऊन पुनः पणजीला येतो.

पावसाळ्याखेरीज नेहमीं १० मी, ११ शी व १२ शी या दिवशीं सांवर्डें ते पणजी या लायनीनें वाफर ठराविक वेळेपेक्षां दोन तास पूर्वी सुटतात. पणजीहून सांवडयाकडे निघणारा वाफर दररोज सकाळीं ११ ला पणजीहून निघून ५॥ च्या सुमारास सांवर्डेस पोंचतो.

## ९ गोव्यांतील प्रचालित वाहनें.

गोव्यांत मांचिलें ( मोटारीमुळें तूर्त हीं वाहनें फारशीं दिसतच नाहींत ), बैलगाडया, घोडयाच्या गाडया व मोटारी अशीं वाहनें प्रत्येक शहरांत व दाट लोकवस्तीच्या खेडयांत मिळतात. साधारण दर्जाच्या खेडयांतूनही हल्लीं

मोटारींचा सुळसुळाट झालेला असल्यानें गोव्याच्या कोण-त्याहि भागांत प्रवास करणें सोयीचें झालें आहे.

## १० फराळाचीं दुकानें व खानावळी.

गोव्यांतील प्रत्येक मोठ्या गांवांतून चहा, कॉफी, दुध व निरनिराळ्या तऱ्हेचा फराळ यांचीं दुकानें आहेत. तसेंच सारस्वत व कऱ्हाडे, चित्पावन इ. ब्राह्मणांच्या खाणावळी आहेत. चांगल्या लोकवस्तीच्या खेडयांनींसुद्धां किराणा मालाच्या दुकानाप्रमाणें चहा, कॉफी फराळाचें एखादें तरी दुकान असतेंच. लहान खेड्यांनीं सदरील दुकानाप्रमाणें खाणावळीची मात्र सोय नसते; तथापि तेथील हिंदु लोक अनोळखी माणसालासुद्धां फार आदरसत्कारानें आपल्या घरीं ठेवून घेऊन त्याच्या जेवणाखाण्याची वगैरे उत्तम सोय करतात.

## ११ गोव्यांतील जकात.

दुसऱ्या हद्दींतून गोव्यांत येणाऱ्या मालाबद्दल गोवा-सरकार जकात घेत असतें. वापरलेल्या वस्तूंना मात्र जकात नसते. पुस्तकें, छापलेले कागद, छापखाना वगैरेची मशि-नरी अशा वस्तूंनाहि सूट मिळते. नित्योपयोगी जरूरीचे जिन्नस, फराळ इत्यादिहि खेरीज करून इतर सर्व जिन्नसां-वर प्रत्येक वस्तूच्या योग्यतेप्रमाणें कमी अधिक प्रमाणांत गोवासरकार जकात घेतें. जकातीला गोव्यांत ‘ आल्फांत ’ म्हणतात.

**गोमंतकीय जकातनाकीं**—उत्तरभागः-किरणपाणी, सांव्हर्जून, न्हयबाग ( पेडणें महाल ); पूर्वभागः-दोडामार्ग, सांखळी ( सांखळीमहाल ), मलें, कुळें, जून नायकिणी ( सांगेंमहाल ); दक्षिणभागः—पोळें, तळपण ( काणकोण महाल ); आणि पश्चिमभागः—बेतूल ( केंपें महाल ), मुर्गांव व पणजी. या सर्वांत पणजी, मुर्गांव व कुळें हीं पहिल्या नंबरचीं जकातनाकीं असून बाकीचीं दुसऱ्या व आणखी कांहीं तिसऱ्या अशा वर्गाचीं आहेत. जकातीची मुख्य कचेरी पणजीला आहे.

## १२ वैद्यकीय तपासणी.

दुसऱ्या हद्दींतून कोणत्याच तऱ्हेचे रोग गोव्यांत येऊं नयेत ह्मणून हद्दीवर असणारा गोवासरकारचा डॉक्टर ( सॅनिटरी इन्स्पेक्टर ) गोव्यांत येणाऱ्या प्रत्येक इसमाची नाडी तपासतो; व नांव, गांव जाण्याचें स्थल इ. माहिती विचारून घेतो. ती माहिती त्याला दिली पाहिजे. तपासतांना एखादा इसम सांसर्गिक रोगानें आजारी असल्याचें आढळल्यास त्याला ३ ते १० दिवसपर्यंत दररोज डॉक्टरच्या तपासणीसाठीं रहावें लागतें. इतक्या अवधींत त्याचा आजार न हटल्यास व तो जास्त भयंकर ठरल्यास, तो बरा होईपर्यंत त्या माणसाला डॉक्टरच्या ताब्यांत रहावें लागतें. निरोगी माणसाला कोणत्याच तऱ्हेची हरकत नसते. प्रवासू इसमांकडील सामान--विशेषेंकरून बिछाना, धुरी देण्यासाठीं सरकारी हमाल घेऊन जातात व त्याला गंधक

वगैरे द्रव्यांची धुरी देतात. नंतर धुरीचे पास देणाऱ्या नोकराकडून प्रत्येक ओझ्यामागें एक असे पास घ्यावे लागतात. केवढीहि लहान गठली असली तरी तिला ८१ देऊन पास घ्यावा लागतो, ह्मणून प्रवासू लोक छोट्या गठल्या एकत्र बांधून एकच मोठी बनवतात. हा धुरीचा पास दाखवून धुरी दिलेलें सामान पुनः आपल्या ताब्यांत घ्यावें लागतें. हें सामान धुरीस घालण्याबद्दल त्या हमालांनीं एखाद्यावेळीं हात पुढें पसरल्यास त्याला कांहींच देण्याची जरूरी नाहीं.

## १३ गोव्यांतील हवापाणी.

गोव्याची हवा फार उत्कृष्ट आहे. समुद्रकिनाऱ्यावरील विहिरींचें खेरीज करून इतर सगळ्या भागांतील पाणी फार उत्तम असतें. कांहीं रानटी खेडयांत पावसाळ्यांत जरा मलेरिया असतो.

गोव्यांत दरसाल ९० इंच पाऊस पडतो. उष्णतामान २७ डिग्री असतें. तें हेमंतऋतूंत १६ डिग्रीपर्यंत उतरूत वसंतऋतूंत ३८ डिग्रीपर्यंत वाढतें. एकंदरींत गोव्याची हवा समशितोष्णच आहे.

## १४ गोव्यांतील मुख्य रस्ते

**पेडणें महालापासून काणकोण महालापर्यंत**--हा रस्ता ६२ मैल लांबीचा असून तो पेडणें महालांतून निघून म्हापशें, पणजी, मडगांव वगैरेवरून काणकोण महालांत जातो व तेथून कारवार जिल्ह्यांतील सदाशिवगडाहून

माजाळीस आलेल्या रस्त्याला भिडतो. या रस्त्यास मध्यंतरीं कोलवाळ, बेर्ती, आगशी, तळपण अशा नद्या लागतात. या रस्त्यावरील प्रवाशांस मोटारींची उत्तम सोय असते.

**बार्देस--सांखळी--वाळपै**—हा रस्ता म्हापशांहून निघून डिचोली, सांखळी, वाळपै या गांवांवरून केळघाटला जातो. याला अस्नोडला एक फांटा फुटून तो सिंकेरव्हाळपर्यंत जातो. डिचोलीहून दोडयामार्गाकडे दुसरा जातो. तिसरा डिचोलीहून पिळगांव धक्क्यापर्यंत जातो व चवथा सांखळीहून चोर्लेघाटापर्यंत जातो.

**पणजी--फोंडें--तिनैघाट**—हा रस्ता पणजीहून निघून भाणस्तारी, कुंडई, मंगेश, म्हाडदोळ, फोंडें, खंडेपार वगैरे गांवांतून तिनैधाटला जातो. बेळगांवहून थेट पणजीस येणाऱ्या मोटारी याच रस्त्यानें येतात. हल्लीं मोटार सर्व्हिस सुरू आहे.

**फोंडें--साष्टी**—हा रस्ता फोंडयांहून निघून बोरीच्या बाजूनें मडगांवला जातो. बोरीचा पूल झाल्यावर या रस्त्याच्या प्रवासूंना बरेंच सोयीचें होईल.

**साष्टी--सांगें**—हा रस्ता मडगांवहून निघून पारोडें, केपें, तिळामळ व सांवर्डे या गांवांतून सांगेला जातो. या रस्त्याला मोटारसर्व्हिस सुरू आहे.

**सांवर्डे--रिवण**—सदरील रस्त्याला तिळामळ येथें फाटा फुटून तो जांबावली, रिवण व तेथून कोळंब, कुर्डी,

नेतर्लींपर्यंत जातो मडगांवहून रिवणपर्यंत जाणारी मोटार-सर्व्हिस याच रस्त्यावरून सुरू आहे. याशिवाय आणखीहि निरनिराळे रस्ते आहेत.

## १५ गोव्यांतील वसती व भाषा.

गोव्याची एकंदर लोकसंख्या ५४०५५१ असून ती ४०७ गांवें व १० लाख ८ हजार कुटुंबें यांत विभागून आहे. गोमंतकीय एकंदर हिंदु २२१०८३ असून, ख्रिस्ती २४७५१८, मुसलमान ४९६१, इतर २०० व धर्मरहीत ७५ मिळून नेहमीं गोव्यांत राहाणारे ४७३८३७, प्रवासी १२९१५ व कामानिमित्य गोव्याबाहेर वास्तव्य करणारे गोमंतकीय ५३७९९ असे लोक आहेत. गोव्यांत मराठी, कोंकणी, पोर्तुगीज, इंग्लिश, मुसलमानी, कानडी, गुजराथी, हिंदी अशा भाषा प्रचलित आहेत. सरकारांत पोर्तुगीज; रेल्वेंत व इंग्लिश, अमेरिकन वगैरे व्यापारी कंपन्यांत इंग्लिश; इतर व्यापारीवर्गांत व हिंदूंच्या कागदपत्रांत मराठी आणि बोलण्यांत सर्वसाधारण लोकांत कोंकणीचा विशेष उपयोग होतो. शिवाय गुजराथी व्यापाऱ्यांत गुज-राथी, मुसलमानी व्यापाऱ्यांत उर्दू, लिंगायत व्यापाऱ्यांत कानडी अशा भाषा चालतात.

## १६ आयात माल.

तांदुळ, भात, गहूं, वाटाणे, हरभरे, मुग, धणे, बाजरी, जोंधळे, नाचणे वगैरे धान्यें. साखर, तंबाकू, सिगारेट, पेट्रोल, मिर्चीं, गुळ, कापसाचें कापड, रेशमी कापड,

लोंकरी कापड, परदेशी दारू, आगपेट्या, सणी कापड, साबण, तेलें, अत्तरें, सुगंधी इतर जिन्नस, कागद, शाई, कांच, परदेशी औषधें, बिस्किटें, इतर औषधी जिन्नस, परदेशी पेपरमिंटच्या वड्या, चहा, कॉफी, निरनिराळ्या कारखान्यांचीं यंत्रें, स्टेशनरी जिन्नस वगैरे माल बाहेरून गोव्यांत येतो.

## १७ निर्गत माल.

नारळ, सुपारी, आंबे, मीठ, मासळी, काजू बी, काजूगर, खोबरें, माशांचे पंख, जळाऊ लांकूड, बांबू, अननसें, फणसें, भेंडी, कात, गोंद, लाख, चुना, मँगेनीज, लोखंड असा माल गोव्यांतून बाहेर जातो.

## १८ गोव्यांत तयार होणारी दारू.

येथें माडांची ( नारळीच्या झाडापासून ), काजूची व ऊंसाची अशी दारू तयार करतात. त्यांत माडांच्या दारूचें प्रमाण मोठें आहे. ही दारू बाहेर जात नसल्यानें गोव्यांतच खलास होते. गोव्यांत एकंदर १११४ दारूचे गुत्ते असून सरकारला दारूपासून निव्वळ उत्पन्न दहा लाख रुपयांचें आहे.

## १९ गोव्यांत पिकणारे जिन्नस.

भात, नारळ, सुपारी, कोकम, अननसें, ओट, डाळिंबें, आंबे, फणस, नारिंगें, पोपई, कलिंगडें, चिबडें, लिंबू, फणसें, जांभळें, केळीं, सुरण, रताळीं, काजू, ऊंस, महाळुंगें, तोंडलीं, कारलीं, भोंपळें, दोडकीं, अळसुंदे, वांगीं, मिरच्या, तवशीं, कारांदे, कांटेकणगें, अळुमाड्या, मिरीं,

कांदे, हळद, बटाटे वगैरे बऱ्याच वस्तू गोव्यांत पिकतात. केळ्यांपैकीं मयणोळीं केळीं येथल्यासारखीं बाहेर दिसत नाहींत.

## २० गोमंतकीय इमारती लांकूड.

सायल (साग), शिसव, मार्ट, किनळ, देवदार, असण, चंदन, सिवण, पातफणस, फणस, वगैरे इमारती लांकडाच्या उपयोगाचीं झाडें इकडे आहेत.

## २१ फुलझाडें.

नागचांफा, कुडचांफा, भुइचांफा, आबोली, अनंत, शंकर, अगस्ती, जसवंत (दसण), सूर्यकांत, कमलाक्ष, गुलाब, केतकी, शब्दुली, नित्यानंद, जाई, जुई, मोगरा, बटमोगरा, शेंवती इ. फुलझाडें आहेत.

## २२ गोमंतकीय रानटी प्राणी.

वाघ, चित्ते, आश्वलें, रानडुकरें, कोल्हे, माकडें, चितळें, मेरू, ससे, वगैरे जंगली प्राणी गोव्याच्या रानांतून असतात.

## २३ गोव्याच्या राज्यव्यस्थेची त्रोटक माहिती.

गोव्याची एकंदर राज्यव्यवस्था गव्हर्नर जनरलच्या हातीं आहे. या अधिकाऱ्याला इकडे ‘ गोव्हेर्नादोर जेराल’ असें म्हणतात. याची नेमणूक पोर्तुगीज रिपब्लीकच्या अध्यक्षांकडून होते. या अधिकाऱ्याच्या हाताखालीं दमण, दीवचे दोन लेफ्टनंट गव्हर्नर व गोव्याच्या अकरा तालुक्यांतील अकरा मामलेदार आहेत. मामलेदारांना गोव्यांत ‘ आदमिनिस्त्रादोर ’ असें ह्मणतात. मामलेदाराच्या हाताखालीं त्या त्या तालुक्यांतील प्रत्येक गांवांत एक असे

पाटील असतात. यांना ‘ रेजिदोर ’ ह्मणतात. गोव्यांतील मामलेदारांना मॅजिस्ट्रेटचे अधिकार नसतात. तथापि छोटे कज्जे यांना निवडतां येतात व मोठ्या कज्ज्यांची प्राथमिक चवकशी करून ते जज्जकोर्टांत पाठवितां येतात. रेजिदोरहि गांवांतील क्षुल्लक कज्ज्यांची चवकशी करतात.

**लष्कर**—गोव्यांतील लष्करच्या मुख्यास “ शॅफि दु इस्तादु मायॉर ” असें म्हणतात. याच्या हाताखालीं सर्व तऱ्हेची सेना असते. पायदळ, घोडेस्वार, मशिनगन्स, पलटण, आफ्रिकन पलठण, गोरी पलठण इ०

**पोलीस खातें**—या खात्याचें मुख्य ऑफिस पणजीला असून त्याच्या मुख्यास “कॉमांदांति जॅराल द पोलिसिअ” असें म्हणतात. प्रत्येक तालुक्यांत एक अशा या खात्याच्या अकरा तालुक कचेऱ्या असून त्यांवर एकेक फौजदार ( कॉमांदांत द पोलीसिअ ) असतो. फौजदाराच्या हाताखालीं एक हवालदार, कांहीं नाईक व पोलीस असे असतात. प्रत्येक गांवांतून एकेक पोलीसचवकी असते, व तेथें कांहीं पोलीस आणि त्यांवर एक नाईक असतो.

**न्यायखातें**—गोव्याचें हायकोर्ट पणजी येथें असून हायकोर्टांत ५ जज्ज आहेत. त्यांतील मुख्यास “ प्रेझिदेंति द रॅलासांव ” असें म्हणतात. हायकोर्टच्या खालीं निरनिराळ्या भागांतून ५ न्यायकोर्टें व दोन सबजज्जकोर्टें आहेत. सिव्हील, क्रिमिनल, कम्मरशीयल वगैरे सर्व दर्जाचे खटले याच कोर्टांतून चालतात. सबजज्जांस ठराविक शिक्षेपर्यंतचे

खटले चालवतां येतात. पणजीच्या हायकोर्टावर अपील करणें झाल्यास पोर्तुगाळच्या सुप्रीम कोर्टांत करावयाचें असतें. प्रत्येक जज्जाच्या हाताखालीं ठळक गांवांनीं ऑनररी मॅजिस्ट्रेट नेमलेले असतात. यांना 'जुइज पोपुलार' म्हणतात. यांना क्रिमीनल खटल्यांची पूर्व चौकशी करणें व अगदीं छोटे खटले निकालांत काढणें असे अधिकार असतात.

**खजिना व वसुली खातें**-या खात्याच्या कचेऱ्या प्रत्येक तालुक्यांतून असून मुख्य कचेरी पणजीला आहे. या खात्यास ' फाझेंद ' ह्मणतात. या खात्याचें काम, करांची वसुली व खजिन्यांतील इतर कामें नोकर लोकांना पगार, स्टँपविक्री वगैरे—करणें असें असतें.

**शिक्षण खातें**—या खात्याची व्यवस्था गोव्यांत बरोबर नाहीं. पणजीस मेडिकल कॉलेज, नॉर्मलस्कूल, लिसेव सेंत्राल नांवाची पाठशाळा व इतर भागांतून प्राथमिक शिक्षणाच्या कांहीं पोर्तुगीज शाळा आहेत. मडगांवला व म्हापशेंला लिसेव मुनिसीपाल आहेत. नवीन काबिजादींतून कांहीं मराठी—पोर्तुगीज शाळा आहेत. शुद्ध मराठीची एकाहि शाळा सरकारनें किंवा म्युनिसिपालट्यांनीं गोव्यांत अजून चालू केलेली नाहीं. गोव्याच्या सर्व भागांतून ज्या आज नमुनेदार मराठी शाळा दिसतात त्या लोकांनीं स्वतःच्या खर्चानें चालविलेल्या आहेत.

**कष्टमखातें**—या खात्यास गोव्यांत ' आल्फांदेग ' म्हणतात. याची मुख्य कचेरी पणजीस असून त्याखालीं प्रत्येक हद्दीवर या खात्याची एकेक कचेरी आहे.

**जंगलखातें**—या खात्याचा बडेजाव मोठा दिसतो. परंतु त्यापासून सरकारला म्हणण्यासारखा फायदा मुळींच नाहीं. यालाच जोडून शेतकी खातेंहि आहे. प्रत्येक तालुक्यांत जंगलखात्याचे अधिकार मामलेदारास असतात.

**पब्लीक वर्क्स, जमीन मोजणी खातें, आरोग्यरक्षणखाते, पोस्ट व तारखातें, रजिस्टर खातें** अशीं निरनिराळीं खातीं आहेत.

**आरोग्यरक्षण**खात्याची मुख्य कचेरी पणजीला असून प्रत्येक तालुक्यांत त्याच्या शाखा आहेत व त्यांवर एकेक सरकारी डॉक्टर आहे.

**रजिस्त सिव्हील खातें**—या खात्याची मुख्य कचेरी इतर खात्यांप्रमाणें पणजी येथें असून त्याखालीं तीन बड्या कचेऱ्या पणजी, ह्मापशें व मडगांव येथें आहेत. या तिन्हींच्या खालीं नवीन काबिजादींत प्रत्येक तालुक्यांत एक अशा तालुककचेऱ्या आहेत. न. का. त या तालुककचेऱ्यांच्याखालीं व जुन्या काबिजादींत पणजी, ह्मापशें व मडगांवच्या कचेऱ्यांखालीं प्रत्येक चांगल्या वसतीच्या गांवांतून एक, अशा छोटया कचेऱ्या आहेत. या खात्याच्या गांवकचेरी कामदाराला ‘ आजुदांत ’, तालुककचेरीच्या नोकराला ‘ ओफिसियाल ’, यांच्या वरच्या कामदाराला ‘ कोंसेव्हींदोर ’ व या खात्याच्या मुख्यास “ कोंसेव्हींदोर झ्यॅराल दु रजिस्त सिव्हील ” असें ह्मणतात.

मूल जन्मलें ह्मणजे ३० दिवसांच्या मुदतींत रजिस्त सिव्हील कचेरींत जावून त्याबद्दलची नोंद करवली पाहिजे.

या जन्मनोंदणीस आठ आणे द्यावे लागतात; शिवाय साडे चार आण्याचें सेलाचें तिकीट दिलें पाहिजे. एखादा इसम वारल्यास सदरील कचेरींत जाऊन, त्याबद्दलची नोंद करवून, पुढील विधीस परवाना घेऊन मगच पुढला विधि आटोपला पाहिजे. या मृत्यूच्या नोंदीबद्दल कामगारास फक्त सहा आणे द्यावे लागतात.

**लग्नाची नोंद** (रजिस्ट्रेशन) करविल्यावांचून गोव्याच्या कोणत्याहि भागांत लग्नें लावतां येणार नाहींत. लग्नमुहूर्ताच्या निदान बारा दिवस पूर्वीं कचेरींत जाऊन आपली लग्न करण्याची इच्छा असल्याबद्दलचें डिक्लेरेशन लिहून कामदाराकडे दिलें पाहिजे. हें डिक्लेरेशन आठ आण्याच्या स्टँपकागदावर लिहिलें पाहिजे व त्यासोबत आपल्या व भावी वधूच्या जन्माचे दाखले, व्हॅक्सिनेशनचीं सर्टिफिकिटें व दोघांपैकीं एकाचा पाटलाकडून घेतलेला अमूक ठिकाणचा रहिवाशी असल्याबद्दलचा पुरावा असे दाखले असले पाहिजेत. यानंतर लगेच तो कामदार या लग्नाबद्दलचे जाहिरनामे लिहून ठळकठिकाणीं डकवून देतो. त्यानंतर दहा दिवसांनीं लग्नाची नोंद (तेर्म) लिहिल्यावर लग्न करण्यास हरकत नसते. जन्मनोंदणीप्रमाणें या लग्नाच्या नोंदणीसाठींहि साडेचार आण्याचें सेलाचें तिकीट द्यावें लागतें. याशिवाय जाहिरनाम्या (यदीताल) बद्दल तीन आणे. त्याच्या, सर्टिफिकीटाबद्दल चार आणे, वधू दुसऱ्या गांवची असल्यास तेथील कामदाराकडून घ्यावयाच्या सर्टिफिकीटाबद्दल सहा

आणे, नोंदणीबद्दल दोन रुपये असा एकंदर खर्च मिळून या लग्नाच्या नोंदणीस ८ आणेवाल्या स्टँपकागदासह ५ ते ६ रुपये पर्यंत खर्च येतो. प्रत्येक नोंद केल्याबद्दल नोंदणीची व अमूक पैसे घेतल्याबद्दलची या खात्याच्या कामदारानें पावती दिली पाहिजे, सांगें महाल, काणकोण महाल व सत्तर महाल या भागांतील लोकांस नोंदणीकामदारास नोंदणीबद्दल द्यावयाच्या पैशापैकीं अर्ध्या रकमेची सूट आहे.

**म्युनिसिपालटचा, लोकलकमिटचा** ( झ्यूंतश् लॉकाइश् ) अशाहि गोव्यांत अस्तित्वांत आहेत.

**गोव्यांतील तालुके**–इल्यश् ( पणजी ), सालसेति (मडगांव), बार्देज (म्हापशें), सांखळी, फोंडें, केपें, काणकोण, सांगें, सत्तर (वाळपै), पेडणें व मुर्गांव असे गोव्यांत अकरा तालुके आहेत.

**न्यायकोर्टें**–इल्यश् (पणजी), सालसेति (मडगांव), बार्देज (म्हापशें), बिशोर्लीं (सांखळी व सत्तर महाल), केपें (केपें, काणकोण व सांगें महाल) अशीं पांच न्यायकोर्टें आणि मुर्गांव व फोंडें अशीं दोन सबजज्ज कोर्टें आहेत. या सगळ्यांवर मुख्य पणजीचें हायकोर्ट आहे. त्यास 'रॅलासांव' म्हणतात.

## २४. गोव्यांतील आठवडचाचे बाजार.

| | |
|---|---|
| सोमवार | सांखळी. |
| मंगळवार | कुंकळ्ळी. |
| बुधवार | डिचोली, वाळपै, सांगें व सांत्रर्डे. |

गुरुवार मडगांव व पेडणें.
शुक्रवार म्हापशें, भाणस्तारी, असोळणें, रिवण.
शनिवार पणजी.
रविवार मडगांव, कुडतरी, चांदर, कळंगूट, फोंडें, केपें, सांवर्डें, कुक्कळी.

## २५. गोव्याच्या कायदेशीर पावत्या.

२ रु १३ आणे ९ पै पासून २८ रु. ९ आणे २ पै पर्यंतचा रकमेच्या पावतीस अर्धा आण्याचें सेलाचें तिकीट डकवलें पाहिजे.

२८ रु. ९ आणे २ पैपासून १४२ रु. १३ आणे ९ पैच्या रकमेच्या पावतीस २ आण्याचें तिकीट लावलें पाहिजे.

१४२ रु. १३ आणे ९ पैपासून २८५ रु. ११ आणे ५ पैपर्यंतच्या रकमेच्या पावतीस तीन आण्याचें तिकीट लावलें पाहिजे.

यापुढें प्रत्येक २८५ रु. ११ आणे ५ पैपर्यंतच्या रकमेच्या पावतीस ३ आण्याचें तिकीट लावलें पाहिजे.

अशारीतीनें तिकिटा लावून, तिकिटांवर तारीख घालून नंतर त्यांवर सह्या केलेल्या पावत्या कायदेशीर समजल्या जातात

## २६. गोव्यांतील मुख्य जत्रा.

चैत्र शु. १ देपासून १५ मेपर्यंत ... श्रीसंस्थान पर्तगाळ.
चैत्र शु. ११ शीपासून १५ मेपर्यंत .... निराकार-डोलयें.
,, ,, १४ शी. ... .... केशवदेवालय--डोलयें.
चैत्र १५ मा. .... पर्वत, मारुतीगड, कुर्डी, नागेशी.

वैशाख शु. ५ मी .... लयराय देवीची जत्रा--शिरगांव.
आश्विन शु. १० मीपासून १५ मेपर्यंत .... पेडणें.
कार्तिक शु. १२ शीपासून १५ मेपर्यंत ... सांगें.
कार्तिक व. ४ थींपासून १० मीपर्यंत .... मडकई.
मार्गशिर्ष शु. १४ शी .... .... .... कुंडई.
,, १५ मा .... शिवनाथ देवालय--शिरोडें, दत्त-जयंत्युत्सव--सांखळी.
,, व. २ या .... .... देऊळमळ--केपें.
,, ,, ८ मी ... .... विभ्रा--पंचवाडी.
पौष्य शु. ५ मीपासून ९ मीपर्यंत ... फातर्पें.
,, व. ५ मीपासून १० मीपर्यंत .... कुर्पें.
पौष्य १५ मा .... मालनी पौर्णिमा--म्हाशेल.
माघ शु. ५ मी .... श्रीशांतादुर्गा देवालय--कवळें.
,, ,, ६ ष्ठी .... श्रीम्हालसा देवस्थान--म्हाडदोळ.
,, व. १४ शी .... महाशिवरात्रोत्सव-मंगेशीं, रामनाथीं.
फाल्गुन व. ४ थींपासून ६ ष्ठीपर्यंत .... मल्लिकार्जुन देवालय--काणकोण.
,, ,, ७ मीपासून १० मीपर्यंत ... शिमगा--रिवण.
,, ,, ८ मीपासून १४ शीपर्यंत .... ,, --जांबावली.

## २७. गोमंतकीय हिंदूचे मोठे सण.

गुढीपाढवा, नारळी १५ मा; गोकुल ८ मी, गणेश ४ थीं, दसरा, दिवाळी, तुलसिविवाह, महाशिवरात्र, शिमगा.

## २८ ख्रिस्ती फेस्तें ( जत्रा )

| | | | |
|---|---|---|---|
| जानेवारी | ६ | ... | चांदर व कुवेली. |
| ” | ६,७,८ | ... | रेइजमाग. |
| फेब्रुवारी | २ | ... | पोंबुर्पे, रायतूर. |
| मार्च | ४ | .... | राय |
| ” | ११ | .... | लोटली |
| ” | २६ | .... | बाणावली व करमणें |
| एप्रील | १४ | .... | (नाझारेथ ) शिरिदांव (श्रीदन) |
| ” | २३,२४,२५ | | ( मिलाग्रि ) ह्मापशें |
| ” | २८,२९,३० | | ( कोंसैसांव ) हळदोणें |
| मे | ३ | .... | ( सांताक्रूज ) केळशी |
| ” | ४,५,६ | ... | ( मांय द देउश् ) साळगांव |
| ” | ५,६,७ | ... | ( प्राजेर, सांतोमे ) रायबंदर |
| ” | ६ | .... | तिळामळ |
| ” | ८ | .... | सांताक्रूज |
| ” | १३ | ... | पारोडें |
| ” | २० | .... | केपें |
| ” | २७ | .... | सांगें |
| ” | २७,२८ | .... | मडगांव |
| आगष्ट | १४ | ... | वेळसांव |
| सप्टेंबर | ९ | .... | चिंचोणें |
| ऑक्टोबर | १५ | ... | कोलवें |
| नोव्हेंबर | ४ | .... | नुव्हें |

| | | | |
|---|---|---|---|
| नोव्हेंबर | ११ | .... | वेर्णे |
| ,, | १७,१८,१९ | | ( रुझार ) नाव्हेली |
| डिसेंबर | ८ | .... | ( कोंसैसांव ) पणजी |
| ,, | ८,९,१० | .... | ( कोंसैसांव ) मडगांव, कळंगूट |
| ,, | १८ | ... | कुरतरी |

## २९ सरकारी सुट्या.

**नॅशनल सुट्या**—१ व ३१ जानेवारी, ३ मे, २१ आगस्ट, ५ ऑक्टोबर, १ व २५ डिसेंबर.

**न्यायकोर्टाच्या सुट्या**—जानेवारी १ ते ६ व ३१. फेब्रुवारी २०, २१, २२. एप्रील १ ते १५. मे १ ते ३१. ऑक्टोबर ५. डिसेंबर १, २, ५, ३१. शिवाय दर रविवारची सुटी असते.

**शिक्षणखात्याच्या सुट्या**—जानेवारी १ ते ६ व ३१. फेब्रुवारी २०, २१, २२. मार्च १५ पासून १४ जूनपर्यंत. ऑक्टोबर ५ पासून २५ पर्यंत. डिसेंबर १, ३, २३ ते ३१. हिंदूंना, गणेश ४ थींची १ दिवस व दिवाळीची सुटी १ दिवस अशा २ खास सुट्या असतात. याशिवाय प्राथमिक शाळांस प्रत्येक गुरुवारीं व रविवारीं आणि दुय्यम विद्यालयांस दर रविवारीं अशा सुट्या असतात.

**म्युनिसिपल सुट्या**—तिसवाडी ( पणजी ), पेडणें, सांखळी २५ नोव्हेंबर, दीव ११ नोव्हेंबर. साळसेत ( मडगांव ) १५ जानेवारी. बार्देज ( म्हापशें ) ५ आगष्ट. मर्गाव ६ सप्टेंबर. दमण २ फेब्रुवारी. केपें २१ फेब्रुवारी.

काणकोण ३१ मार्च. सांगें ८ मे. फोंडें ३१ मे. नगरहवेली (दमण) १७ डिसेंबर.

## ३० गोमंतकीय मापें.

**धान्यांचीं**-२ सोळावीं-१ गिनाटें. २ गिनाटीं-१ अंणाटें. २ अंणाटीं-१ आठवा. २ आठवे-१ शेर. ४ शेर-१ पायली. २ पायल्या-१ कुडव. २ कुडव-१ मण. २० मण-१ मणखंडी. २० कुडव-१ कुडवखंडी. (हल्लीं पडींनी व्यवहार सुरू आहे.)

**पातळ पदार्थांचीं**-२ नवटांक-१ पावशेर. २ पावशेर १ अर्धा शेर. दोन अर्धे शेर-१ शेर. ४ शेर-१ गोलें. ४ गोलीं-१ मण.

## ३१ गोमंतकीय वजनें.

२॥ तोळे-१ औंस. ४ औंस-१ पावरात. २ पावरात-१ अर्धा रात. २ अर्धे रात-१ रात. ४ रात-१ पासरी. ८ रात-१ धडा. २ धडे-१ अर्धामण. २ अर्धे मण-१ मण. २० मण-१ खंडी.

## ३२ गोमंतकीय उद्योगधंदे.

गोव्यांतील लोकांचा मुख्य धंदा जरी शेतीचा असला, तरी त्याशिवाय निरनिराळे इतर धंदेहि गोव्यांत ठिकठिकाणीं चालू आहेत. म्हापशें, मडगांव वगैरे भागांत जशीं तांब्याचीं भांडीं सुरेख तयार करतात, तशींच डिचोलीला पितळी भांडीं चांगलीं बनवतात. डिचोली व शिर्दै येथील मातीचीं भांडीं सुबक व टिकाऊ असतात. तेलाचे घाणे,

लांकडी फुलें, लांकडी निरनिराळें सुंदर व टिकावू फर्नीचर, रंगीत काम, मंगलोरी जातीचीं कौलें व विटा, साबण, औषधी–भस्में–गुटिका, बांगड्यांचा धंदा, सुंभ–रज्जू, फळांचा मुरंबा, टोव्यांचा कारखाना, हातमाग, शोभेची दारू, मातीचीं चित्रें करणें, फोटो, चित्रकला, मँगेनिजचा धंदा, तेल–पीठ–तांदुळ यांच्या गिरण्या, शाई, कॉलनवॉटर, अत्तरें, छापखानें, शिलाई, सोन्यामोत्यांचे दागिनें करणें, लोहारकाम, सुतारकाम, तबला वादन, तंतु वादन, गायन, करवती, गंवडीकाम, चांभारकाम, बुटमेकींग इ० बरेच धंदे, गोव्यांत सुरू आहेत. साखरेचा कारखानाहि सुरू होता; परंतु परदेशी साखरेपुढें टिकाव धरणें कठीण झाल्यानें तो लगेच बंद झाला.

सर्व तऱ्हेचा दांडगा व्यापार मडगांव, पणजी, म्हापशें व मुर्गांव या शहरांनीं चालतो. तेथें निरनिराळ्या जातीच्या लोकांच्या पेढ्या व मोठमोठीं दुकानें आहेत. याशिवाय इतर गावांतून तेथील लोकवस्तीप्रमाणें लहानमोठें उद्योगधंदे चालतात.

## ३३. गोव्यांतील लॉटऱ्या.

**सांत काझ दा मिझेरीकोर्दिय** (पणजी), **ओसपीसियु** (मडगांव) **आझीलियु** (म्हापशें) या गोमंतकीय तीन संस्था जुगाराच्या कामांत प्रसिद्ध आहेत. या तिन्हीं संस्थांच्या सोडती बाहेर देशींहि पुष्कळ खपतात. प्रत्येक संस्थेच्या सबंध सोडतीची किंमत ५ रु. असून दरएक

भागास १ रु. पडतो. १ ली व २ री या संस्थांच्या लॉटऱ्या दरमहा व ३ रीची वर्षांतून दोन खेपा अशा असतात. बक्षिसें १५ रुपयांपासून ५५ हजार रुपयांपर्यंत असतात.

## ३४. बँका.

पोर्तुगालमध्यें स्थापन झालेल्या **बांकु नासियोनाल** नांवाच्या बँकेची गोव्यांत पणजी येथें मुख्य शाखा असून मुर्गांव, मडगांव, म्हापशें व मुंबई अशा तिच्या उपशाखा आहेत. जगाच्या बहुतेक सर्व भागांतून या बँकेच्या शाखा असल्यामुळें जगाच्या कोणत्याहि भागांतून येथें येणाऱ्या प्रवाशांस या बँकेच्या सोयीचा फायदा घेतां येतो.

येथील दुसरी बँक म्हटली म्हणजे सरकारी **पोस्टल सेव्हिंग बँक** होय. प्रत्येक पहिल्या व दुसऱ्या वर्गाच्या पोस्टांत या बँकेचें खातें असतें. शिवाय गोमंतकीय पेढीवाले हुंडयांचा व्यवहार करतात व त्या हुंडया बेळगांव, पुणें, मुंबई वगैरे बाजारांत पटत असतात.

## ३५. गोव्यांतील प्रमूख मराठी विद्यालयें.

गोवा विद्याप्रसारक मंडळाचें **आल्मैद** विद्यालय (फोंडें) श्रीसारस्वत विद्यालय, ज्ञानप्रसारक विद्यालय (म्हापशें); श्रीदामोदर विद्याभूवन (मडगांव); श्रीशारदा विद्यालय (कुंभारजुवें); मुष्टिफंड विद्यालय, महालक्ष्मी प्रासादिक विद्यालय (पणजी); विद्यावर्धक मंडळ–विद्यालय(डिचोली); श्रीलक्ष्मी–सरस्वती विद्यालय, ज्ञानप्रसारक विद्यालय (कुंकळ्ळी); श्रीशंकर विद्यापीठ, सरस्वती विद्यालय

( कवळें ); म्हालसा विद्यापीठ ( म्हाडदोळ ); शारदाविद्यालय, महादेव विद्यालय ( काकोडें ); जेठी मराठी शाळा ( मुर्गांव ); ऋषिवन–मराठी शाळा ( रिवण ); श्रीमल्लिकार्जून विद्यालय ( काणकोण ), श्रीरवळनाथ विद्यालय, सीताराम विद्यालय ( पेडणें ); मुरलीधर विद्यालय ( सांखळी वगैरे प्रत्येक गांवांतून लहान मोठ्या मराठी शाळा असून त्या सर्व लोकांनीं स्वतःच्या पैशांनीं चालवल्या आहेत. अशा लहान मोठ्या एकंदर शाळा जवळ जवळ २०० आहेत.

## ३६ गोमंतकीय मराठी वाचनालयें.

सारस्वत ब्राम्हण समाज, श्रीदामोदर वाचनालय, दैवज्ञ ब्राम्हण समाज ( मडगांव ); श्रीसरस्वती मंदिर, श्रीपांडुरंग वाचनमंदिर, बालवाचनालय ( पणजी ); विद्यावर्धक वाचनमंदिर, ( डिचोली ); रवनाथ वाचनालय ( पेडणें ); सारस्वत वाचनालय, ज्ञानप्रसारक मंदीर, दैवज्ञ ब्राह्मण वाचनमंदीर (ह्मापसें) शारदावाचनालय (रायबंदर) श्रीशांतादुर्गा वाचनालय(कुंभारजुवें) श्रीवेताळवाचनालय(असोळणें) श्रीलक्ष्मीसरस्वतीवाचनालय,श्रीशांतादुर्गावाचनालय कुंकळ्ळी श्रीशांतादुर्गा ग्रंथसंग्रहालय (कवळें); श्रीमांगिरीष वाचनालय ( मंगेश ); बालोन्नति समाज ( केपें ); भारतमित्र वाचनालय ( रिवण ) अशीं चांगल्या लोकवस्तीच्या प्रत्येक गांवांतून वाचनालयें आहेत.

## प्रचलित मराठी नियतकालिकें.

भारत साप्ताहिक ( केपें ); भारतमित्र मासिक (रिवण) हिंदु साप्ताहिक ( मडगांव ) आर्यविज्ञान मासिक (सांगें),

मनमोहन मासिक (मंगेशी) अशीं पाच मराठी नियतकालिकें
तूर्त गोव्यांत सुरू आहेत.

## ३८ शस्त्रांचा कायदा.

परवाना असल्यावांचून गोव्यांत बंदुका, तलवारी वगैरे शस्त्रें वापरण्यास व बरोबर बाळगण्यासहि मनाई आहे. नेहमींच्या उपयोगाचे कामकरी लोकांचे कोयते, चाकू, कात्र्या, वस्तरे अशा दर्जाच्या वस्तु बीन परवाना वापरतां येतात.

## ३९ गोमंतकीय नाणें व नोटा.

गोवा सरकारचीं पै, अर्धापैसा, पैसा, ढबू (दोन पैसे), चवली, पावली, अधेली, रुपया, असें नाणें असून, पाव रुपया, अर्धा रुपया, एक रुपया, अडीच रुपये, पांच रुपये, दहा रुपये, वीस रुपये, पन्नास रुपये, शंभर रुपये अशा कागदी नोटा आहेत.

## ४० स्टँप कागद.

सरकारच्या कोणत्याहि खात्यांत अर्ज करणें झाल्यास आठ आणे किंमतीच्यां स्टँप कागदावरच अर्ज केला पाहिजे. तसेंच निरनिराळे दाखले वगैरे याच कागदावर घ्यावे लागतात.

## ४१ दहा आणे कर.

पणजी, मुरगांव व कुळें या बाजूंनीं गोव्याबाहेर जाणाऱ्या प्रत्येक इसमामागें दहा आणेप्रमाणें हा कर गोवासरकार

वसूल करतें. हा विचित्र कर सुरू होऊन बराच काळ लोटला; परंतु अद्याप त्याचें उच्चाटण होत नाहीं !

## ४२ गोव्यांतील तारखातें.

गोव्यांतील १ ल्या व २ ऱ्या वर्गाच्या सर्व पोस्टकचेऱ्यांना जोडूनच तारकचेऱ्याहि आहेत.

सकाळीं ७ ते संध्याकाळीं ५॥ वाजेपर्यंत तारकचेऱ्यांनीं तारा घेतात.

**जरूरीच्या तारा**-१२ शब्दांपर्यंत सगळीकडे १॥ रु. पुढें प्रत्येक शब्दास ८-॥.

**साध्या तारा**—१२ शब्दांपर्यंत ८ आणे. पुढें प्रत्येक शब्दास अर्धा आणा.

**तारेची नक्कल**--एकाच मजकूराच्या जरूरीच्या किंवा साध्या तारेच्या प्रत्येक नकलेस २ आणे हंशील पडतें.

**सुटीच्या दिवशीं**--रविवारसारख्या सुटीच्या दिवशीं गोव्यांतल्यागोव्यांत सर्व तऱ्हेच्या तारा व गोव्याबाहेर फक्त जरूरीच्या तेवढ्याच पाठवतां येतात.

**तारेच्या मनिआर्डरी**—या मनिऑर्डरी करण्यास तारहंशिलाशिवाय रकमेप्रमाणें मनिऑर्डरीचे दर भरावे लागतात. अशा मनिऑर्डरी गोव्यांतल्या गोव्यांत पाठवणें झाल्यास, त्या, गोव्याच्या कोणत्याहि भागांतील २ ऱ्या वर्गाच्या पोस्टल तारकचेरींत स्वीकारतात; आणि त्या गोव्याबाहेर पाठविणें असल्यास फक्त पणजीच्या हेड्ऑफिस मधूनच पाठविल्या पाहिजेत. तारेला गोव्यांत ‘ तेलेग्राम ’ ह्मणतात.

## ४३ टपालखातें.

गोव्यांत १ ल्या, २ ऱ्या व ३ अशा तीन वर्गांच्या टपालकचेऱ्या आहेत. प्रत्येक कचेरीच्या अधिकारमर्यादे-प्रमाणें सर्व कामें चालतात.

**पोस्टांत रजिस्टरें घेण्याच्या वेळा**–सकाळीं ७ पासून संध्याकाळीं ५॥ वाजेपर्यंत.

**मनिऑर्डरी घेण्याच्या वेळा**—सकाळीं ९ पासून संध्याकाळीं ४ वाजेपर्यंत. या वेळांत प्रत्येक ठिकाणच्या टपालच्या सोयीप्रमाणें तो तो पोष्टमास्तर फरक करीत असतो.

आदितवारीं मनिऑर्डरी व इन्शुअर पत्रें पोस्टांत स्वीकारीत नाहींत.

**पोस्टल सेव्हिंग बँक**—गोव्यांतील १ ल्या व २ ऱ्या वर्गाच्या सर्व पोस्टांतून या बँकेचा व्यवहार चालतो. हिला "**काइश् एकोनोमिक पोस्ताल**" असें ह्मणतात. कमींत-कमी चार आण्यापासूनव्ही रक्कम या बँकेंत ठेवतां येते.

गोव्यांत रजिस्टर्डला--रेजिस्ताद, मनिऑर्डरला--व्हालि, पोस्टकार्डाला--बिल्योति पोस्ताल, तिकिटाला--इस्तांपील्य, वर्तमानपत्राला--झ्यॉरनाल, छापलेल्या कागदांना--इंप्रेसुश्, नमुन्या ( सॅम्पल ) ला--आमॉश्त्र्श्, इन्शुअरला--व्हालोर, देक्लराद, पोस्टाला--कुन्हैयु असें ह्मणतात.

४० तोळ्यांच्या रत्तलास ४५९ ग्राम असतात.

टपाल हंशील—

| | गोवा दमण दीव. | पोर्तुगाल व पोर्तुगीज वसाहती. | ब्रिटिशइंडिया एडन, सिलोन. | परदेश. |
|---|---|---|---|---|
| **पत्रें** | | | | |
| २० ग्रामपर्यंत ... ... | अर्धा आणा | दीड आणा | — | अडीच आणे |
| पुढें प्रत्येक २० ग्रामांस ... | पाव आणा | पाऊण ,, | — | दीड आणा |
| प्रत्येक १५ ग्रामांस ... ... | — | — | अर्धा आणा | — |
| **कार्डें** | पाव आणा | पाऊण आणा | पाव आणा | दीड आणा |
| **वर्तमान पत्रें** | | | | |
| प्रत्येक ५० ग्रामांस— | | | | |
| कचेरींतून रवाना केल्यास ... | एक पै | एक पै | दीड पै | पाव आणा |
| खासगी रीतीनें पाठवल्यास ... | पाव आणा | पाव आणा | — | ,, ,, |
| **पुस्तकें किंवा छापलेले कागद** | | | | |
| प्रत्येक ५० ग्रामांस ... ... | पाव आणा | पाव आणा | पाव आणा | अर्धा आणा |
| **हस्तलिखितें** | | | | |
| १०० ग्रामापर्यंत ... ... | अर्धा आणा | — | — | — |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २५० ,, ,, ... ... | — | — | दोन आणे | अडीच आणे |
| ३०० ,, ,, ... ... | — | दीड आणा | — | — |
| पुढें ५० ग्रामांस ... ... | पाव आणा | पाव आणा | एक आणा | अर्धा आणा |
| **नमुने** | | | | |
| १०० ग्रामांपर्यंत ... ... | अर्धा आणा | अर्धा आणा | पाऊण आणा | एक आणा |
| पुढें प्रत्येक ५० ग्रामांस ... | पाव आणा | पाव आणा | ४॥ पै | अर्धा आणा |
| **विमा उतरलेलीं पत्रें किंवा वस्तु** | | | | |
| प्रत्येक १८५ रुपयांस किंवा तेवढ्या किंमतीच्या वस्तूस ... ... | दीड आणा | दीड आणा | तीन आणे | तीन आणे |
| **रजिस्ट्रेशन चार्ज** | दोन आणे | दोन आणे | दोन आणे | दोन आणे |
| रजिस्टर्ड घेणाऱ्याच्या सहीची पावती रजिस्टर्ड करतांनाच मागवण्यास ... | अर्धा आणा | दीड आणा | एक आणा | अडीच आणे |
| **मनिऑर्डरी** | | | | |
| १० रुपयांपर्यंत (५ पैच्या तिकीटाशिवाय) | दोन आणे | — | दोन आणे | — |
| २५ ,, ,, ( ,, ,, ,, ,, ) | चार आणे | — | चार आणे | — |
| ५० ,, ,, ( ,, ,, ,, ,, ) | आठ आणे | — | आठ आणे | — |
| ट० बंद करण्याच्या अखेरच्या वेळेबद्दलचें हंशील | एक आणा | एक आणा | एक आणा | एक आणा |

## ४४. मीठ.

मिठाची उत्पत्ती तिसवाडी, साष्टी, बार्देस व काणकोण महाल या भागांत होते. आरभीं शेतासारखी जमीन तयार करून त्या जमिनींत क्रमाक्रमानें खारें व गोडें पाणी घेऊन मीठ बनवतात. गोव्यांत मीठ फार सवंग मिळतें.

## ४५. मासळी.

काणकोण, साष्टी, तिसवाडी, बार्देस, फोंडे महाल या भागांत मासळी भरपूर मिळते.

## ४६. चुना.

समुद्रांत किंवा खाऱ्या नदींत मिळणाऱ्या कर्पापासून इमारतींच्या उपयोगाचा जुना बनविण्याच्या भट्टया जुवें, दुर्भाट, कुट्ठाळ, तिसवाडी, साष्टी, बार्देस, सावर्डे या भागांत आहेत.

## ४७. सुंभ--रज्जू.

साष्टी, तिसवाडी, बार्देस, फोंडें महाल, काणकोण या भागांत सुंभ व रज्जू मोठ्या प्रमाणांत तयार करतात. नारळाच्या काथ्यापासून बनविलेल्या ह्या वस्तु बऱ्याच टिकाऊ असतात. यापासून मोठमोठीं दोरखंडेंहि बनवितात

## ४८. गोव्यांतील रुग्णालयें.

पणजीच्या सरकारी रुग्णालयाशिवाय मडगांवला 'ओस्पीस' संस्थेचें म्हापशास आझीलचें व रायबंदरला 'मिझेरीकोर्द' संस्थेचें अशीं रुग्णालयें आहेत. सदरील रुग्णालयांतून हिंदु रोग्यांची सोय बरोबर होत नाहीं;

म्हणून निव्वळ हिंदूसाठीं एका रुग्णालयाची गोव्यांत आज जरूरी आहे.

## ४९. सुपारी.

सांगें, फोंडें, काणकोण, सांखळी, अशा नवीन काबिजादींतील महालांतून मोठ्या प्रमाणावर फोफळीचीं झाडें असून त्या भागांत सुपारी बरीच तयार होते. सुपारीच्या एका झाडावर चढून वरच्यावर सगळीं झाडें वानराप्रमाणें फिरणें व वरच्यावर सुपारी काढून घेणें हा देखावा मोठा प्रेक्षणीय दिसतो. कार्तिक, मार्गशीर्ष महिन्यांतील हें दृश्य अपरिचित माणसानें तर जरूर पाहावेंच. सुपारी झाडावरून काढल्यानंतर ती एकेक सोलून त्यांतला गर काढणें, तो पाण्यांत टाकणें व उकळणें आणि नंतर वाळविणें अशी व्यवस्था झाल्यावर सुपारी तयार होते. सफेत सुपारी मात्र झाडावरून काढून घेतल्यावर नुसतीच वाळवितात व सोलतात

## ५० प्रेक्षणीय धबधबे

बार्देज तालुक्यांत पीर्ण येथें जो धबधबा आहे त्याची उंची ४५ फूट आहे. सांखळी तालुक्यांतील हरवळें येथील धबधब्याची उंची ६०•फूट आहे. **दुधसागर** हा गोव्यांतील प्रमूख धबधबा असून याची उंची ३९० फूट आहे. कॅसलरॉकच्या बाजूनें गोव्यांत येतांना आगगाडींतून या धबधब्याचा मनोहर देखावा सहज दिसतो.

## ५१ गोमंतकीय किल्ले.

तेरेखोल व हळर्ण हे दोन किल्ले पेडणें तालुक्यांत असून शापोरा, बाग, आग्वाद, रेइजमाग हे बार्देज तालुक्यांत

आहेत. ताळगांव व काबु हे किल्ले पणजींत आहेत; मुर्गांव किल्ला मुर्गांव तालुक्यांत असून रामाचा किल्ला काणकोण महालांतील खोल येथें आहे. खोरजुवें किल्ला खोरजुवें बेटांत असून राशोल किल्ला साष्टी तालुक्यांतील रायतूर येथें आहे. सत्तर तालुक्यांतील वाळपैलाहि एक किल्ला आहे. पैकीं तेरेखोल, बाग, रामाचें भुशीर व हळर्ण हे चार किल्ले मराठाकालीन असून इतर सर्व पोर्तुगिजांनीं बांधलेले आहेत. या सर्वच किल्ल्यांची व्यवस्था आज बरोबर नाहीं; तथापि ऐतिहासिक म्हणून ते प्रेक्षणीय वाटतात.

## ५२ प्रेक्षणीय स्थळें.

**असोळणें**—हें गांव सासष्टी तालुक्यांत असून मडगांवहून अंदाजें २॥ कोस आहे. येथें ख्रिश्चनांची वस्ती फार, परन्तु हिंदूंचीहि बरीच आहे. येथील "श्रीवेताळप्रासादिक वाचनालय" संस्था चांगली आहे.

**अडफडें**—हें गांव बार्देज तालुक्यांत असून मुंबई युनिव्हर्सिटींत रजिस्टर्ड झालेलें येथील इंग्लिश हायस्कूल प्रसिद्ध आहे. म्हापशें येथून अडफडें ७ मैल आहे.

**अस्नोडें**--हें गांव म्हापशें येथून ६ मैलांवर आहे. भोंसले-पुर्तुगेज यांचीं लढाई याच गांवांत झाली होती. येथें हिंदु देवालयहि आहे,

**आरोबा**—म्हापशाहून हें गांव ५ मैलांच्या अंतरावर असून पोर्तुगीज सरकारचे इनामदार श्रीमंत आरोबेकर देसाई यांचा भव्य व विस्तीर्ण वाडा येथेंच आहे.

**कवळें**—हें गांव फोंडें तालुक्यांत असून वांफरच्या 'दुर्भाट' धक्क्यापासून १॥ मैल आहे. येथील श्रीशांतादुर्गा देवालय फार प्रसिद्ध व प्रेक्षणीय आहे. गौडसारस्वत स्मार्त सांप्रदायी स्वामींचा श्रीकैवल्यमठ येथेंच आहे. मठाचे हल्लींचे अधिपती श्रीमत्पूर्णानंद सरस्वती स्वामीमहाराज यांचें वास्तव्य तूर्त येथेंच असून त्यांचा हाच मठ प्रमूख आहे. याशिवाय या संस्थानचे सांखळी, खानापूर, नाशिक, काशी वगैरे भागांत आणखीहि मठ आहेत. कवळें गांव प्रेक्षणीय आहे. हल्लीं याच गांवांत श्रीसंकेश्वर पीठाच्या जगद्गुरूंनीहि आपला एक मठ बांधला आहे.

**कळंगूट**—हें गांव बार्देज तालुक्यांत असून ह्मापशें येथून ९ मैल आहे. येथें समुद्र अगदीं जवळ असल्यानें मासळी पुष्कळ मिळते. येथें ख्रिस्ती लोकांचीच वस्ती फार. या व याच्या लगत असलेल्या कांदोळी गांवांत कांदा पुष्कळ लावतात. कळंगुटला एक छापखाना असून एक पोर्तुगीज वर्तमानपत्रहि प्रसिद्ध होत असतें. येथें हिंदूंनीं चालविलेलें 'श्रीशांतादुर्गा' नांवाचें मराठी वाचनालय आहे.

**काणकोण**—हें तालुक्याचें गांव आहे. हा भाग इ. स. १७६४ त सौंधेकरांकडून पोर्तुगीजांकडे आला. येथें बाल-बंधुसमाज वाचनालय, श्रीमल्लिकार्जुन विद्यालय व श्रीमल्लि-कार्जुन हें प्रसिद्ध देवालय अशा संस्था आहेत. येथून श्रीसंस्थान पर्तगाळ ६ मैलांवर आहे. मडगांवहून कारवार-कडे जाणारी मोटारसर्व्हिस याच गांवावरून जाते.

**कुंकळ्ळी**–येथें विजापूरकर व पोर्तुगीज यांची लढाई जुंपली होती. तेथील मराठे लोकांनीं बाटाबाटीच्यावेळीं पाद्रींचा धिंगाणा न सोसवल्यामुळें चार पांच पाद्रींचीं धैर्यानें मुंडकीं उडवलीं होतीं. निरनिराळ्या रंगीत व इतर लांकडी सामानाच्या बाबतींत हें गांव फार प्रसिद्ध आहे. येथें मोटारसर्व्हीस सुरू असल्यानें पाहिजे तेव्हां मडगांव किंवा काणकोणकडे जाण्यास सोयीचें असतें. येथें श्रीलक्ष्मी–सरस्वति विद्यालय व वाचनालय आणि श्रीशांतादुर्गा विद्यालय व वाचनालय अशा संस्था आहेत.

**कुंभारजुवें**-कै० नारायणराव धुमे, कै० पुरुषोत्तम बाबा केंकरे, वै० घोडेकर या गतकालीन प्रसिद्ध पुरुषांची ही जन्मभूमि असून सदरील पुरुषांचे वंशजहि हल्लीं येथेंच असतात. येथील श्रीशारदाविद्यालय व श्रीशांतादुर्गा वाचनालय प्रसिद्ध आहेत. येथून महाशेल अगदीं जवळ आहे. कुंभारजुवेंच्या कांकड्या प्रसिद्ध आहेत. हें वाफरचें बंदर आहे.

**केंपें**–हा भाग इ. स. १७६३ सालीं सौंधेकरांकडून पोर्तुगीजांस मिळाला. गोव्याचें प्रसिद्ध पोर्तुगीज–मराठी साप्ताहिक '**भारत**' येथें निघत असून त्याचा छापखानाहि येथेंच आहे. येथील 'बालोन्नति' समाजाचें वाचनालय प्रसिद्ध आहे. सांवर्डे, सांगें; रिवण येथून मडगांवला जाणाऱ्या येणाऱ्या मोटारी यांच गांवावरून जात येत असतात. येथून सावर्डे रेलवे स्टेशन ४॥ मैल आहे.

**केरी** ( पेडणें ) इतिहासप्रसिद्ध शूर पुरुष बक्षिबहादर जिवबादादा केरकर यांचें जन्मस्थान हेंच होय. या गांवांत

दादांचा भव्य वाडा असून वाड्यांत त्यांचे वंशज राहातात. पेडण्याहून हें गांव ९ मैल असून वाडी संस्थानच्या आरं-वंद्याहून अवघें २ मैल आहे.

**केरी**-(फोंडें) गोव्याचे प्रसिद्ध आर्यवैद्यक-पानवेलकर वैद्य घराणें याच गांवचें आहे. येथील नवदुर्गा देवालय प्रेक्षणीय आहे. फोंड्याहून केरी ६ मैल व झाडदाळहून ४ मैल आहे.

**कोलवें** — हें गांव मडगांवहून ५ मैल असून समुद्राची हवा घेण्यास येथें उत्तम सोय आहे. या गावांहून जवळ जवळ असलेल्या बाणावली, वारकें, करमणें, केळशी या समुद्रतीरावरील गांवांत पुष्कळ लोक समुद्रस्नानासाठीं व हवेसाठीं जातात: सदरील गांवचे मच्छिमारे लोक मोठमोठीं जाळीं समुद्रांत सोडून पुष्कळ प्रकारची मासळी धरतात. येथून मचवे भरून मासळी बाहेरगांवींहि रवाना करतात. जाळीं तिरावर ओढून घेतांना व त्यांत चुळबुळ करणारी पुष्कळ मासळी पाहातांना मोठी मौज वाटते.

**चांदर**—हें रेलवे स्टेशन असून येथून कुडतरी गांव व पारोडें जवळ आहेत.

**जुवें**—इतिहास प्रसिद्ध विठ्ठलराव वर्दे वालावलीकर यांचें जन्मगांव हेंच होय. येथें आतां ख्रिस्ती लोकांचीच फार वसती आहे. हें गाव तिसवाडी महालांत आहे.

**जुनें गोवें**-गोवा सरकारची पहिली राजधानी याच गांवीं होती. येथें सांफ्रांसिस्कु, सांतु कायतानु अशीं

प्रचंड चर्चे आहेत. या सांफ्रांसिस्कनें ख्रिश्चन धर्म वाढविण्याच्या वेडांत अनेक गोमांतकीयांचे हाल हाल करण्याच्या कामांत प्रामुख्यानें भाग घेतला होता. येथें पणजीहून मोटारसर्व्हीस सुरू असून सांवर्डेहून पणजीस जाणारे येणारे व पणजीहून वळवैला जाणारे येणारे वाफर येथें बंदर करतात.

**डिचोली**—हें एक लहानसेंच पण टुमदार शहर आहे. येथील 'विद्यावर्धक मंडळ' नांवांची शिक्षणप्रसारकसंस्था सुप्रसिद्ध आहे. येथें सर्वतऱ्हेचा व्यापार चालतो. येथील मातीचीं भांडीं सुबक व टिकाऊ असल्यानें लोकप्रिय आहेत. वाफरच्या पिळगांव बंदरहून, बेतीं-म्हापशें येथून व सांखळीहून येथें येण्यास मोटारी मिळतात. इ.स.१७८१ त सावंतवाडीकरांकडून हा भाग पोर्तुगीजांनीं घेतला.

**डोंगरी**—मडगांवहून, जुन्या गोव्याहून पणजीहून व मंडूर या वाफरच्या धक्क्यावरून डोंगरीस जातां येतें. येथील श्रीराममंदिर प्रेक्षणीय आहे. प्रसिद्ध नाटयाचार्य कै० अण्णासाहेब किर्लोस्कर यांचे नाटयशास्त्राचे गुरू वे. शा. सं. वै. श्रीकृष्णभट बांदकर यांचें जन्मस्थान डोंगरीच असून तेथील श्रीराममंदिरहि त्यांचेंच आहे. वै. बांदकरांना मराठी नाटयकलेचे आद्यजनक म्हणण्यास हरकत नाहीं.

**थोरलें गोवें**—आगशीहून मोटारनें पणजीस जातांना ३ मैलांच्या अंतरावरच हें गांव लागतें. येथें आतां पहाण्यासारखें विशेष कांहीं नाहीं; तथापि कदंबराजांची राजधानी

येथेंच होती, म्हणून मोडकीं तोंडकीं अद्याप दिसत असलेलीं येथील पूर्वकालीन स्मृतिचिन्हें अभिमानानें पहावींशीं वाटतात. ख्रिस्ती लोकस्ती येथें विशेष आहे. येथील मीठागर पाहाण्यासारखे आहेत.

**पणजी**—हें गोंवासरकारच्या राजधानीचें शहर असल्यानें सरकारी सर्व खात्यांच्या येथें मुख्य कचेऱ्या आहेत. पब्लीकवर्क्स, नेव्हिगेशनखातें, सर्वे-खातें, जमाबंदी खातें, पोस्ट व तारखातें, सरकारी छापखाना, गॅझेट कचेरी, सरकारी वाचनालय, लष्करची मुख्य छावणी, तोफखाना, घोडेस्वार पलटण, आफ्रिकन लोकांची पलटण, गोरी पलटण, गव्हर्नरचा पॅलेस, सेक्रेटरी-एट, म्युनिसिपालटी, हायकोर्ट, जकातखात्याची मुख्य कचेरी इ. प्रेक्षणीय आहेत. म्युनिसिपल बाग रमणीय असून लोकांना विश्रांति घेण्यासाठीं या स्थलाचा बराच उपयोग होतो. विजेचे दिवे व टेलिफोनची व्यवस्थाहि येथें आहे. मुष्टिफंड संस्थेच्या मराठी शाळा, पांडुरंग विद्यालय, पोर्तुगीज प्राथमिक व दुय्यम शिक्षणाच्या शाळा, मेडिकल कॉलेज, हॉस्पिटल, नॉर्मल स्कूल, श्रीसरस्वती मंदीर, श्रीपांडुरंग वाचनालय वगैरे पाहाण्यासारखीं आहेत. येथें सर्व तऱ्हेचा व्यापार मोठ्या प्रमाणांत चालतो. निरनिराळ्या व्यापारी लोकांच्या येथें बऱ्याच पेढ्या आहेत. पणजीस ब्रिटीश तारऑफिसहि असल्यामुळें येथून ब्रिटिश इंडियेंतील कोण-त्याहि भागांत तारा पाठवितां येतात.

खाणावळी, चहाकॉफी दुकानें यांची सोय येथें उत्तम असून घोडयांच्या गाड्या, मोटारी वगैरे वाहनांची चांगली रेलचेल आहे. येथील बांकुनासियोनाल बँकेची इमारतहि प्रेक्षणीय आहे.

गोव्याची राजधानी पूर्वी जुनें गोवें येथें होती; परंतु तेथें पटकीचा भयंकर आजार उद्भवल्यामुळें इ. स. १७६९ त तेथून गोवा-राजधानीचें स्थलांतर पणजीला करण्यांत आलें. मलीक युसफ गुर्गी या मुसलमान अधिकाऱ्याकडून इ. स. १५१० त पोर्तुगीजांनीं पणजी शहर घेतलें. पणजीला मुर्गांव, सांवर्डे, वळवै, हळदोणें इ. कडून वाफरनें; मडगांव, ह्मापशें वगैरेकडून मोटारनें ( नदी उतरून ) व बेळगांवहून कुठेंहि न उतरतां थेट मोटारनें आणि मुंबई, रत्नागिरी, वेंगुर्लें वगैरे भागांतून बोटीनें जातां येतें. पणजीला गोव्याच्या राजधानीचें स्थलांतर होण्यापूर्वी तेथें फक्त कोळी लोकांचीच वसती होती व त्यावेळीं या भागाला ‘ पांज ’ असें ह्मणत असत.

**पर्तगाळ**—येथें गौडसारस्वत वैष्णव सांप्रदायी धर्मगुरूंचा विस्तीर्ण व सुरेख मठ असून त्यामुळेंच हें गांव विशेष प्रसिद्ध आहे. तूर्त या संस्थानच्या गादीवर श्रीमदिंदिराकांततीर्थ स्वामी महाराज हे असून त्यांचे शिष्य श्रीमत्कमलानाथतीर्थ स्वामी महाराज हे आहेत. संस्थानच्या या मठांत चैत्रांत श्रीरामनवमीचा उत्सव मोठ्या थाटांत होत असतो. या उत्सवास दूरदूरच्या भागांतील लोकांचीहि

प्रचंड गर्दी जमत असते. उत्सव चैत्र शु॥ १ दे पासून १५ मेपर्यंत पंधरा दिवस चालतो. नवमी दिवशीं रथोत्सवास विशेष गर्दी असते. पर्तगाळ संस्थान सर्व दृष्टीनें प्रेक्षणीय आहे. येथें येणाऱ्या सर्व लोकांची जेवणाखाणाची व रहाण्याची वगैरे सोय संस्थानतर्फे नेहमीं उत्कृष्ठ चालते हें गांव काणकोणहून ४॥ मैल आहे. पावसाळ्याखेरीज इतर दिवसांनीं मडगांवहून सरळ पर्तगाळपर्यंत मोटारी जातात. मध्यंतरी ओढा असल्यानें पावसांत तेवढ्या जात नाहींत. या मुख्य मठाशिवाय या संस्थानचे, फणसकोंडें, बाळ्ळी, रिवण, डिचोली व ब्रिटिश इंडियेंतील भागांतहि आणखी बरेच मठ आहेत.

**पेडणें**—हें तालुक्याचें गांव आहे. हा भाग सांवतवाडकरांनीं पोर्तुगीजांकडे कांहीं कारणासाठीं गहाण ठेवला होता. नंतर तो तसाच पोर्तुगीजांनीं आपलासा करून घेतला. तेथील मराठी शाळा, रवळनाथ वाचनालय, श्रीभगवतीदेवालय इ. प्रेक्षणीय आहेत. येथील रावराजे देशप्रभू यांचा भव्य वाडाहि पहाण्यासारखा आहे. येथें येण्यास म्हापशेंहून कोलवाळच्या बाजूनें व सावंतवाडीकडून आरवंद्याच्या किंवा सांतडर्याच्या अशा बाजूंनी मोटारी मिळतात. येथील श्रीमाहुलीच्या तळीकडील पाण्याचा झरा उत्तम आहे.

**फोंडें**—हें तालुक्याचें शहर असून इतिहासप्रसिद्ध आहे. विजापूरकरांची गोव्याची राजधानी एकेकाळीं येथेंच होती. येथील सप्पा मसीद विजापूरकालीन आहे, पोर्तुगीज व

विजापूरकर, छत्रपती संभाजी व पोर्तुगीज आणि पेशवे व पोर्तुगीज यांच्या लढाया येथेंच झाल्या होत्या. येथील 'आल्मैद'कॉलेज नावांची हिंदूंची उत्कृष्ट शिक्षणसंस्था सुप्रसिद्ध आहे. हा तालुका हिंदूंच्या अनेक देवालयांमुळें फार प्रेक्षणीय आहे. या तालुक्याच्या बहुतेक भागांतून हातमागांचे कारखाने आहेत. दुर्भाटच्या धक्क्यावर उतरणाऱ्या वाफराच्या उतारूंसाठीं व मडगांवच्या बाजूनें मोटारमधून येणाऱ्या लोकांसाठीं दुर्भाटला मोटारी सज्ज असतात व त्या फोंडें, कवळें, रामनाथ, बांदिवडे वगैरे भागांत नेतां येतात पणजीच्या मोटारी येथें झाडदोळच्या रस्त्यानें सरळ येतात. आणि बेळगांवहूनहि थेट येऊं शकतात. फोंड्यांस 'महाराष्ट्रसाहित्यमंदिर' नांवाचें उपयुक्त वाचनालयहि आहे.

**बाळ्ळी**—हें गांव कुकळ्ळीपासून अगदीं जवळ असून मडगांवहून काणकोणला निघालेल्या रस्त्यावरच आहे. तेथें श्रीगोकर्ण पर्तगाळी संस्थानाधिशांचा एक मठ आहे. येथून फातर्पेचें श्रीशांतादुर्गा देवालय १॥ मैलावर आहे.

**बांदिवडें**—श्रीरामनाथ, श्रीमहालक्ष्मी, श्रीनागेश अशीं येथें प्रेक्षणीय देवालयें असून श्री० सौंधेकरांचा राजवाडा याच गांवांत आहे. श्रीमंत सौंधेकर तूर्त याच राजवाड्यांत असतात. इ. स. १६७० ते १७०० पर्यंत नव्या काबिजादीचा सर्व कारभार श्री. सौंधेकरच स्वतंत्र रीतीनें पाहात असत. परंतु पुढें जेव्हां हैदरअल्लीचा डोळा सौंधेकरांवर झाला, तेव्हां त्याच्या भीतीनें सौंधेकर फिरंग्यांच्या

आश्रयाखालीं राहिले. याचवेळीं आपणाकडे असलेला भाग सौंधेकरांनीं फिरंग्यांकडे संपवून त्याबद्दल त्यांकडून दरसाल ४८०० रुपये घेण्याचें कबूल केलें. ही गोष्ट श्री. इमोडी सदाशिवराव या सौंधेकर राजांच्या कारकीर्दींत घडून आली.

**मडगांव**—व्यापाराच्या जंगी उलाढालीमुळें हें गोव्याच्या हद्दींतील प्रमूख व्यापारीशहर गणलें जातें. शिवाय गोमंतकच्या मध्यभागांत हें शहर असल्यामुळें इतरहि अनेक दृष्टींनीं याला बरेंच महत्व आहे. मडगांवांत रेलवेस्टेशन गांवांतच आहे. येथून गोव्याच्या बहुतेक ठळक भागांत मोटारींची रहदारी सुरू आहे. येथील निरनिराळ्या व्यापारी पेढ्या, तांदुळ–तेल–पीठ यांच्या गिरण्या, निरनिराळ्या मालांचीं जंगी दुकानें, छापखाने, वर्तमानपत्रें, सारस्वत ब्राह्मण समाज, श्रीदामोदर विद्याभुवन, दै. ब्रा. वाचनालय, निरनिराळ्या सरकारी कचेऱ्या, म्युनिसिपालिटीची नमुनेदार इमारत, 'ओस्पीस' संस्था व तिच्या इमारती, हॉस्पीटल, 'आनाफोंति' नांवाचा पाण्याचा झरा, श्रीहरीमंदिर, श्रीविठ्ठलमंदिर व० प्रेक्षणीय आहेत. गोमंतकचें 'हिंदु' नावांचें मराठी पत्र येथेंच निघतें. येथें चहा, कॉफी, फराळाचीं दुकानें अनेक असून निरनिराळ्या जातीच्या ब्राह्मणी खाणावळी वगैरे सोयी आहेत.

विजापूर गादीसंबंधीं इब्राहीम आदिलशहा व मीर अल्लीखान यांच्यांत तंटा उपस्थित होऊन एका पक्षास आश्रय दिल्याबद्दल त्या पक्षाकडून बक्षिसादाखल इ. स.

१५४३ त 'मार्तीस आफोंस द सौज' या गव्हर्नरच्या कारकीर्दींत मडगांवसह हा साष्टीचा भाग पोर्तुगीजांस मिळाला गोमंतक वसविण्याच्या वेळीं सरस्वती तीरावरून जे दहा सारस्वत ब्राह्मण गोव्यांत आले, त्यांच्या ह्म. गोव्याच्या पहिल्या राजधानीचा मान मडगांवनेंच पटकाविला होता.

**मांद्रें**—हें गांव पेडणें तालुक्यांत असून येथील श्रीराम-विद्यालय व श्रीराममोफत वाचनालय या संस्था चांगल्या आहेत.

**मुर्गांव**–हें शहर मडगांव, पणजी व म्हापशें यांच्या-मानानें तूर्त जरी लहान असलें तरी उत्तम बंदर, बंदरा-लगत रेलवे स्टेशन इ. उत्कृष्ट सोयींवरून पाहातां तें विशेष महत्वाचें असें मानण्यास हरकत नाहीं. या शहराचें क्षेत्र दिवसेंदिवस वाढत आहे. बार्देस व साष्ट या भागांबरोबरच मुर्गांवहि पोर्तुगिजांच्या हातीं आलें. येथील बंदर इतकें उत्कृष्ट आहे कीं, परदेशांतून येणाऱ्या मोठाल्या बोटीहि या धक्क्याला उत्तमप्रकारें लागतात. येथें सर्व तऱ्हेचा व्यापार लहानमोठ्या प्रमाणांत चालतो. येथील मुर्गांव शिक्षणसंघाच्या शाळा, वाचनालय, इंग्लिश स्कुलें, रेलवे इंस्टिटयूट, स्टॅंडर्ड ऑईल कंपनी, बर्मा ऑईल कंपनी, एशियाटिक पेट्रोलियम कं. अशा कंपन्यांचीं ऑफिसें व तेलाच्या मोठाल्या टांक्या, ब्रिटिशकॉन्सल, नॅव्हिगेशन कंपनी ऑफिसें, रेलवे ट्रॅफिक सुपरिंटेंडेंट ऑफिस, रेलवे हेड तारऑफिस, सरकारी कचेऱ्या, उत्तम पाण्याचा झरा,

प्रसिद्ध जुना किल्ला वगैरे प्रेक्षणीय आहेत. खाणावळी, चहा-कॉफी फराळाचीं दुकानें वगैरेची सोय चांगली आहे.

प्राचीनकाळीं श्रीदुर्गादेवीनें ह्या भागांत मुरू नांवाच्या दैत्याचा संव्हार केला त्याचें हें गांव असल्यानें त्याला 'मुरगांव' असें नांव पडल्याचें सांगतात.

**म्हापशें**—हें बार्देस तालुक्याचें मुख्य गांव असून येथें सर्व तऱ्हेचा व्यापार मोठ्या प्रमाणांत चालतो. येथील व्यापारी पेठ प्रसिद्ध आहे. येथील 'सारस्वत विद्यालय' 'वैश्य विद्यालय या संस्था नमुनेदार असून 'आशिलियु' नांवाचीहि एक जुगारी संस्था व तिचें हॉस्पिटल आहे. सत्तर-सांखळी-डिचोली, बेतीं, कळंगूट, कोलवाळ वगैरेकडून येणाऱ्या जाणाऱ्या मोटारींची ह्मापशाला बरीच रेलचेल होते. इ. स. १७४१ त, सावंतवाडीकरांकडून हा भाग पोर्तुगीजांनीं घेतला.

**रायबंदर**—येथें जुन्या कालीं विजापूरकरांची राजधानी होती. येथील किल्ल्याचा मोडका भाग अद्याप दिसतो. येथील मिझेरीकोर्दीचें हॉस्पिटल प्रेक्षणीय आहे. रायबंदरला सदानंद नांवाचें मुद्रणालय आहे. कुंभारजुवें व बेळगांव-फोंडें येथून पणजीस जाणाऱ्या मोटारींच्या रस्त्यावरच हें गांव आहे. येथें सांवर्डे, वळवै वगैरेचे वाफर बंदर करतात.

**रायतूर**—हें गांव मडगांवहून ४॥ मैलांच्या अंतरावर असून येथें वाफरचें बंदरहि आहे. कॅथोलिकपंथी मिशनरी-पाद्री बनवून त्यांचा पुरवठा अखिल हिंदुस्थानांत व

-सिलोन, ब्रह्मदेशांतहि करणारी "सेमिनार" नांवाची संस्था येथें आहे. येथें एक पडका किल्ला असून त्याच किल्ल्यांत ह्या संस्थेची इमारत व चर्च आहे.

**रिवण**—या गांवाला प्राचीनकालीं 'ऋषिवन' ह्मणत असत. येथें टांक नांवाचा उत्कृष्ट पाण्याचा झरा, मॅंगेनीज व लोखंडाच्या खाणी, स्त्रियांस रांगोळ्यांच्या उपयोगी येणाऱ्या सफेत (या मातीपासून कांच तयार होते.) व पिवळ्या मातीच्या खाणी, विस्तीर्ण पांडवगुहा (या गुहेंत कांहीं वर्षांमागें आजूबाजूस थोडें हातानें पोखरलें असतां मातीचे वाटोळे गोळे मिळत व त्यांत ब्राह्मीसारख्या लिपीची मृत्तिकेचीच वाटोळी मोहोर असे.), वैष्णव सांप्रदायी मठ, श्रीविमलेश्वर, श्रीदामोदर (जांबावली) अशीं देवालयें वगैरे प्रेक्षणीय आहेत. येथें '**भारतमित्र**' नांवाचें मासिक निघत असतें. मडगांवहून रिवणला मोटारसर्व्हीस सुरू आहे. शिवाय सांवर्डे स्टेशनवर व केपें, सांगें वगैरेकडे रिवणला येण्यास मोटारी मिळतात.

**सांवर्डें (कुडचडें)**—येथें रेलवेस्टेशन व वाफरचें बंदर अशीं दोन बंदरें असल्यामुळें हें गांव आतां छोट्याशा शहरांतच गणलें जात आहे. खाणावळी, चहाकॉफी फराळाचीं व निरनिराळ्या व्यापाराचीं दुकानें, तांदुळ-तेल-मीठ यांच्या गिरण्या, टाईलफॅक्टरी वगैरे व्यवस्था आहे. येथून काकोडें, सांगें, जांबावली, रिवण, केपें वगैरेकडे जाणें सोयीचें आहे.

**सांखळी**—हें एक छोटेखानी शहर असून येथें श्रीदत्ताचें सुप्रसिद्ध देवालय, श्रीपांडुरंगदेवस्थान, मराठी विद्यालयें, हातमाग कारखाना, स्मार्तसांप्रदायी गौ. सा. स्वामींचा मठ वगैरे संस्था प्रेक्षणीय आहेत. सत्तर, म्हापशें–डिचोली, पिळगांव वगैरेवरून येथें मोटारी येत असतात.

**सांगें**—हें तालुक्याचें गांव आहे. ह्या तालुक्याचा भागहि पोर्तुगिजांना सौंधेकरांकडून मिळाला. येथें श्रीपांडुरंग, श्रीदत्तात्रेय अशीं सुंदर देवळें असून आर्यविज्ञान नांवाचें मासिक येथेंच निघत असतें. येथें सांवडर्यांहून व मडगांव–केप्यांकडून मोटारींची रहदारी सुरू आहे.

**सत्तर**—या महालाच्या मुख्य कचेरीची जागा वाळपैला आहे. हा महाल राणे लोकांची जन्मभूमि म्हणून प्रसिद्ध आहे. हा भाग इ० स० १७८१ त वाडकर सरदेसाई यांकडून पोर्तुगीजांनीं घेतला. या भागांतील नाणसाचें कोट, हरवळेंची राणे लोकांस यशापयश दाखवणारी शिळा इ. स्थलें पाहाण्यासारखीं आहेत. म्हापशांहून डिचोली–सांखळीवरून येथें सकाळसंध्याकाळ मोटारसर्व्हिस सुरू आहे.

**हरमल**—हें गांव पेडणें तालुक्यांत असून पेडण्याहून ७॥ मैलांच्या अंतरावर आहे. येथील राखेचा डोंगर प्रसिद्ध असून तो श्रीपरशुरामकालीन महायज्ञांतील भस्माचा आहे असें सांगतात. येथील गुहा पाहाण्यासारख्या वाटतात.

## ५३ प्रसिद्ध देवालयें.

**अनंत**—श्रीअनंताचें देवालय फोंडें महालांतील वेरें

येथें आहे. देवाल्य लहानच परन्तु सुंदर असून देवाल-याचा तळाव फार चांगला आहे.

**अनंत**—सांगें महालांतील नेतर्ली या गांवांतहि एक अनंताचें सुंदर देवालय आहे.

**कपिलेश्वर**—हें देवालय फोंडें महालांतील कवळे गांवांत व कपिलेश्वरीवाडींत आहे. देवालयांतील लिंग शिवाचें आहे. येथील जत्रोत्सव प्रेक्षणीय असतो.

**कामाक्षा**—फोंडें महालांतील शिरोडें या गांवांत असलेलें 'श्रीकामाक्षेचें देवालय बरेंच मोठें व प्रेक्षणीय आहे. येथें दसऱ्याचा उत्सव प्रेक्षणीय होत असतो. यांशिवा येथें बरेच प्रेक्षणीय उत्सव होतात.

**कालिकादेवी**—श्रीकालिकादेवीचें भव्य व प्रेक्षणीय देवालय बार्देस तालुक्यांतील कांसारपाल या गांवीं आहे. या देवालयाची महाजनमंडळी दैवज्ञब्राम्हणांपैकींच आहे. देवालयांत बरेच प्रेक्षणीय उत्सव होत असतात. कांसारपालचा रा. बाबली नांवाचा सनईवाला सनईवादनांत मोठा प्रवीण आहे.

**केशव**—काणकोण महालांतील लोलयें गांवीं हें देवालय असून तें विस्तीर्ण व सुंदर आहे. चैत्र शु॥ १४ शीला येथें जत्रा भरते.

**गणपती**—म्हाशेलहून अगदीं जवळ असलेल्या खंडोळें गांवांत श्रीगणपतीचें देवालय आहे. गणपतीची मूर्ति प्रेक्षणीय आहे.

**चंद्रेश्वर**—श्रीचन्द्रनाथ नावांच्या पर्वतावर हें देवालय आहे. सांवर्डयाहून केप्याच्या बाजूनें किंवा मडगांवहून पारोड्याला जाऊन नंतर पर्वत चढला पाहिजे. रेलवेच्या

चांदर स्टेशनावरून पायवाटेनें पारो यास येऊन नंतर पर्वत चढतां येतो. पारोडयापासून म्हणजे पर्वताच्या पायथ्यापासून नवख्या मनुष्यास पर्वतशिखर गांठण्यास जवळ जवळ एक तास लागतो. शिखरावरच हें सुंदर देवालय आहे. येथून गोव्याच्या सगळ्याभागाचें निरीक्षण करतां येतें. पर्वतावर ठिकठिकाणीं झरे असून त्यांना 'गणेशतीर्थ' कपीलतीर्थ, अशीं नांवें आहेत. श्रीचंद्रेश्वराच्या देवालयाजवळ भूतनाथाचें देवालय आहे. भूतनाथाची मूर्ति भव्य आहे. येथील चैत्र १५ मेचा उत्साह बहारीचा असतो व त्या उत्सवासाठीं लोकांची प्रचंड गर्दी जमते.

के **चामुंडेश्वरी**—केपें तालुक्यांतील देऊळमळ येथें हें देवालय असून तें छोटेंच आहे. येथें मार्गशिर्ष व० २ स जत्रा भरत असते.



**दामोदर**—श्रीदामोदराचें देवालय सांवर्डे रेल्वेस्टेशनावरून ६ मैलांच्या अंतरावर असणाऱ्या जांबावली या गांवीं आहे. दामोदराचें मूलस्थान मडगांव; परंतु पोर्तुगीजांच्या बाटाबाटीच्या कहराच्या वेळीं तें स्थान बदलून जांबावलीस श्रीदामोदर देवालय बांधण्यांत आलें. येथें अनेक उत्साह होत असतात. त्यांत आश्विन १५ मेचा व शिमग्याचा उत्सव हे प्रसिद्ध आहेत.' आश्विन १५ मेदिवशीं श्रीचा अवसर येऊन तप्त तेलांत हात घालून हातानें वडे काढतो. शिमग्याच्या दिवसांत निरनिराळ्या तऱ्हेचा उत्तम कार्यक्रम सुरू असतो; आणि म्हणूनच या उत्सवास लोकांची प्रचंड गर्दी जमते. बऱ्याच उत्सवांत येथें अन्नसंतर्पण असते.

**देवकीकृष्ण**—कुंभारजुव्यांहून जवळ असणाऱ्या म्हाशेल येथें श्रीदेवकीकृष्णाचें सुंदर देवालय आहे. या मुख्य देवला-

शिवाय येथें इतरहि बरींच देवालयें आहेत. म्हाशेलांत मालनी पौर्णिमेचा उत्सव पौष्य पौर्णिमेला बहारीचा होत असतो.

**देवकी-कृष्ण**—वेलींगजवळील गोठण येथेंहि श्रीदेवकीकृष्णाचें प्रसिद्ध व प्रेक्षणीय देऊळ आहे.

**दत्त**—सांखळी येथील दत्तवाडींत श्रीदत्तमहाराजांचें प्रशस्त देवालय आहे. या देवालयांत गुरुद्वादशी व दत्तजयंती हे उत्सव बहारीचे होतात. हें स्थान फार पवित्र आहे. याशिवाय सांखळींत मुरलीधर वगैरेंचीं देवालयें आहेत.

**दत्त**—सांगें येथेंहि श्रीदत्ताचें छोटें परंतु सुरेख देवालय आहे. या देवालयांतहि गुरु १२ शी, दत्तजयंती असे उत्सव होत असतात.

**दामोदर**—काणकोण महालांतील लोलयें येथें हें देवालय असून तें प्रेक्षणीय आहे. येथें निरनिराळे चांगले उत्सव होतात. येथील मुख्य उत्सव फाल्गुन व. १० दिवशीं असतो.

**दामोदर**—मडगांव येथें जुन्या बाजारांत श्री. नाईक यांच्या घरांतहि श्रीदामोदरमूर्ति आहे. प्रत्येक सोमवारीं येथें भजन सुरेख चालतें.

**नरसिंह**—म्हाडदोळहून जवळ असलेल्या वेलींग गांवांत हें सुप्रसिद्ध देवालय असून तें जरूर पाहाण्यासारखें आहे.

**नवदुर्गा**—फोंडें तालुक्यांतील केरी गांवांत श्रीनवदुर्गेचें सुंदर देवालय आहे. येथें कांहीं उत्सव चांगले होतात.

**नवदुर्गा**—सदरील तालुक्यांतच बोरी गांवांतहि श्रीनवदुर्गेचें एक प्रशस्थ देवालय आहे. येथील अनेक उत्सवांपैकीं जत्रेचा उत्सव बहारीचा होतो.

**नागेश**—हें श्रीनागेशाचें सुंदर देवालय फोंडें तालुक्यांतील बांदिवडें या गांवांत व नागेशी या वाडींत आहे.

दुर्भाटपासून हें देवालय अडीच मैलांवर आहे. श्रीरामनाथ देवालयापासून हें अगदीं जवळ आहे. श्रीनागेशाचें लिंग स्वयंभु आहे. देवालय चांगलें असून समोरील देवाचा तलाव फार प्रसिद्ध आहे. येथील उत्सव बरेच प्रेक्षणीय असतात. कांहीं उत्सवांना अन्नसंतर्पणहि असतें.

**निराकार**–काणकोणहून कारवारकडे गेलेल्या रस्त्याजवळच हें देवालय असून तें चांगल्यापैकीं आहे. सभामंटपहि विस्तीर्ण आहे. या देवालयांत चैत्र शु. ११ शीपासून पौर्णिमेपर्यंत होणारा उत्सव प्रेक्षणीय असतो. देवालयांत लांकडी लिंग आहे.

**परशुराम**–काणकोण महालांतील पैंगीण येथें हें देवालय आहे. देवालयाची मुख्य जत्रा फाल्गुन व. २ या व ३ या असे दोन दिवस असते.

**पांडुरंग** श्रीपांडुरंगाचें हें देवालय सांगें येथें आहे. देवालय लहानच परंतु टुमदार आहे. या देवालयांत आषाढी व कार्तिकी एकादशीला बरा उत्सव असतो. त्यांत कार्तिक शु. एकादशीचा उत्सव जास्त मजेचा असतो व तो कार्तिक पौर्णिमेपर्यंत चालतो. पाडव्या दिवशीं रथोत्सव असतो.

**पांडुरंग**–सांखळी येथेंहि श्रीपांडुरंगाचें एक सुंदर देवालय असून त्यांत कांहीं प्रेक्षणीय उत्साह होतात.

**भगवती**–पेडणें येथें श्रीभगवतीचें टुमदार व सुरेख देवालय असून देवालयांत अनेक उत्सव होत असतात. त्यांत दसऱ्याचा उत्सव फार महत्वाचा व गर्दीचा असतो. देवालय गांवच्या मध्यभागीं आहे.

**मल्लिकार्जुन**—श्रीमल्लिकार्जुन देवालय काणकोण येथें असून देवालयास उत्पन्न बरेंच आहे. काणकोण गांवांपासून

देवाळय २॥ मैलांच्या अंतरावर आहे. येथील मुख्य जत्रा फाल्गुन व॥ ४ थींपासून ६ ष्टीपर्यंत असते.

**महादेव**-श्रीमहादेवाचें देवालय सांवर्डे रेलवे स्टेशनापासून जवळ असलेल्या काकोंडे गांवांत आहे. देवालय चांगलें असून सभामंडप विस्तीर्ण आहे. या देवळांत काला, शिमगा असे कांहीं उत्सव होतात. परंतु त्या सर्वांत जास्त मजेदार उत्साह श्रावण मासांतील सप्ताहाचा होत असतो.

**महालक्ष्मी**-श्रीमहालक्ष्मीचें हें देऊळ पणजी शहरांत डोंगराच्या पायथ्याशीं आहे. या देवालयाच्या विस्तीर्ण सभामंडपाचा, अनोळखी प्रवाशांस धर्मशाळेप्रमाणें उत्तम उपयोग होतो. देवालयाची व्यवस्था उत्तम असून उत्सव प्रेक्षणीय होतात.

**महालक्ष्मी**-फोंडें महालांतील बांदिवडें गांवांत श्रीनागेश देवालयाजवळ हें देवालय असून तें भव्य व सुंदर आहे. चौक विस्तीर्ण व फार सुशोभीत असल्यानें तो सगळीकडे प्रसिद्ध आहे. येथें बरेच प्रेक्षणीय उत्सव होत असतात. येथील तिन्ही त्रिकाल झडणारा चौघडा कर्णमधूर असतो. श्रीमहालक्ष्मीचें मूलस्थान सासष्टी महालांतील कोलवें हा गांव होय. १६ व्या शतकांतील ख्रिस्ती धर्मप्रसाराच्या गडबडीच्या वेळीं देवीची स्थापना तूर्तच्या जागीं आणून करण्यांत आली.

**मंगेश**-बेळगांवहून थेट पणजीस जाणाऱ्या मोटार रस्त्यावरच हें सुप्रसिद्ध देवालय आहे. अखिल गोव्यांत हें पहिल्या नंबरचें देवस्थान आहे. तेथें येणारे इसम वाफराच्या कुंडई बंदरावरहि उतरत असतात. कुंडईहून हें स्थान १॥ मैलावर आहे.

श्रीमंगेश लिंगाचा उदय सासष्टी भागांतील 'कुट्ठाळ' या गांवीं झाला, पण पुढें जेव्हां हा भाग पोर्तुगीजांकडे

गेला त्यावेळीं पोर्तुगीजांच्या जाचास कंटाळून इ. स. १५६० च्या सुमारास हिंदुसत्तेखालीं असलेल्या तूर्तच्या जागीं श्रीमंगेश लिंग आणून लोमशर्मा व शिवशर्मा या दोघां भक्तांनीं तें स्थापन केलें. या देवालयास पेशवे सरकारांतून बऱ्याच उत्पन्नाची जागा इनाम मिळाली आहे. देवालय मोठें व सुरेख आहे. येथें पुष्कळ तऱ्हेचे अनेक उत्सव होत असतात. तेथील बहुतेक सर्व उत्सवांना अन्न संतर्पण असतें. चौघडा इ. वादनाची या देवस्थानांत उत्तम व्यवस्था आहे. देवालयाचा उंच खांब, सुंदर तलाव इ. प्रेक्षणीय आहेत. येथें महाशिवरात्रीची जत्रा मुख्य असते, व त्या दिवशीं प्रेक्षणयि रथोत्सवही असतो.

**माधवनाथ**—हें देवालय सांगें तालुक्यांत कुर्पे येथें आहे. येथें पौष्य व॥ १० मी दिवशीं सुरू होणारा काल्याचा उत्सव प्रेक्षणीय असतो.

**म्हाळसा**—समुद्रमंथनानें काढलेल्या १४ रत्नांच्या वांटणीच्या वेळीं देव दैत्यांत माजलेला झगडा युक्तीनें मिटवण्यासाठीं परमेश्वरानें घेतलेलें मोहिनीरूप हाच श्रीम्हाळसा देवीचा अवतार आहे असें म्हणतात. या देवीची मूलस्थापना सासष्टी महालांतील वेर्णें या गांवीं केली होती, परंतु १६ व्या शतकांत बाटविण्याबद्दल धुमाकूळ घालणाऱ्या पाद्री लोकांच्या जाचामुळें तेथून श्रीम्हाळसेची मूर्ति उचलून आणून तूर्तच्या जागीं म्हाडदोळला तिची स्थापना करण्यांत आली. पुढें कै० रामचंद्र मल्हार सुखठणकर यांनीं देवीस पेशवे सरकारांतून बरीच इनाम जमीन मिळवून दिली. देवालय जुन्याच पद्धतीचें परंतु सुरेख असून सभामंडप विस्तीर्ण आहे. येथील मुख्य जत्रा माघ शु ६ ष्टीपासून

सुरू होते. इतर मोठ्या देवालयांप्रमाणें येथेंहि चौघडावादन आहे. झाडदोळ हें मंगेशींहून अगदीं जवळ असून बेळगांवकडून पणजीस जाणाऱ्या मोटारी याच देवालयाजवळून जातात

**रामनाथ**—फोंडें तालुक्यांतील बांदीवडें या गांवांत हें देवालय असून कवळें येथील श्रीशांतादुर्गा देवालयापासून अगदीं जवळ आहे. श्रीरामनाथाचें मूलस्थान साष्टी महालांतील 'लोटली' हें होय. १६ व्या शतकांतील पाद्र्यांच्या अत्याचारांस कंटाळून महाजनमंडळीनें श्रीरामनाथ व बेताळ वगैरे इतर मूर्ति आणून रामनाथीं स्थापन केल्या. पुढें कांहीं वर्षांनीं तें देऊळ जीर्णस्थितीस पोंचल्यामुळें सध्याचें भव्य व नयनमनोहर देऊळ बांधण्यांत आलें. देवालयांत अग्रभागीं श्रीलक्ष्मीनारायणाची मूर्ति व खालीं श्रीरामनाथाची मूर्ति अशा स्थापन केल्या असून उजवीकडील गाभाऱ्यांत श्रीकामाक्षादेवी व डावीकडील गाभाऱ्यांत श्रीशांतादुर्गादेवी अशा स्थापिल्या आहेत. या मुख्य देवालयाजवळच श्रीबेताळ व कालभैरव यांचीं छोटीं देवळें आहेत. येथें नेहमीं चौघडा झडत असतो. या देवालयांत अनेक उत्सव होत असतात. मुख्य उत्सव महाशिवरात्रीचा असतो. या उत्सवांतील रथोत्सव मजेदार असतो.

**लक्ष्मीनारायण**—म्हापशें शहरांत हें नमुनेदार देवालय आहे. याच्याजवळच श्रीमारुतीचें व थोड्याच अंतरावर श्रीशांतादुर्गेचें अशीं देवालयें आहेत. तिन्ही देवालयांत निरनिराळे उत्सव होतात. श्रीलक्ष्मीनारायणाचें देवालय नवीन पद्धतीचें आहे.

**लक्ष्मीनारायण** – डिचोली येथेंहि श्रीलक्ष्मीनारायणाचें सुंदर देवालय आहे.

**लयरायदेवी**--बाफरच्या हलदोणें बंदरहून जवळ असणाऱ्या शिरगांव गांवांत हें देऊळ असून तें सुरेख व बरेंच प्रसिद्ध आहे. ह्मापशाहून डिचोलीस गेलेल्या रस्त्यानें या देवालयाकडे मोटारमधून जातां येतें. वैशाख शु० ५ मीला येथें जंगी जत्रा जमत असते. या दिवशीं देवाची पालखी खांद्यावर घेणारे व निष्ठापूर्वक पवित्र राहणारे लोक ( यांना धोंड ह्मणतात ) पेटलेल्या आगीच्या निखाऱ्यांतून शांतपणें चालत जातात. हा देखावा गंभीर परंतु फार प्रेक्षणीय वाटतो.

**वामन**---कवळ्यापासून जवळ असलेल्या धवळी गांवांत हें देवालय आहे. येथें निरनिराळे उत्सव होत असतात.

**विमलेश्वर**---सांवर्डे रेलवे स्टेशनापासून ८ मैलांच्या अंतरावर असलेल्या रिवण गांवांत हें देवालय आहे. देवालयांतील लिंग स्वयंभ आहे. श्रीविमलेश्वर देवालयासंबधींची प्राचीन माहिती मुंबईच्या 'रॉयल एशियाटिक म्युझियम' मधील एका ताम्रपटावर त्रोटकशी मिळते असें सांगतात. हें स्थान मोठें जागरूक आहे. देवालयांत बरेच प्रेक्षणीय उत्सव होतात; त्या सर्वांत दैविक बाबतींत नवरात्रोत्सव व मजेच्या बाबतींत शिमग्याचा उत्सव असे बहारीचे असतात. नवरात्रोत्सवांत ९ मी दिवशीं रात्रौ कोणीहि धरल्याशिवाय पाटावर तरंग ( मुसळासारखें असून त्याला लुगडीं गुंडाळून फुलांच्या माळा घालतात. वरच्या टोंकावर देवाची मूर्ति असते. ) उभें राहातें. हें दृश्य बरेंच प्रेक्षणीय असल्यानें तें पाहाण्यासाठीं दूरदूरच्या भागांतूनहि लोक येत असतात.

या देवालयासमोर एक छोटी तळी आहे. तळींत येणारें णी पाषाणी गाईच्या मुखांतून प्रवेश करून मूत्रद्वारांतून

तलावांत पडतें. या गाईची पाठ शस्त्र घांसल्याप्रमाणें खोलगट झालेली आहे. कोणाहि इसमाला या गाईवर शस्त्र घांसून धार लावण्याची सक्त मनाई असतां, कोणत्याहि वेळीं पाहिल्यास गाईच्या पाठीवर आतांच कोणीतरी शस्त्र घांसून गेल्यासारखें वाटतें ! गोष्ट मोठी आश्चर्यकारक वाटते !

**विठ्ठलमंदिर**---मडगांव शहरांतील 'कोंब' वाडींत गीं देवालय हल्लींच बांधलेलें आहे. आषाढ शु० ११ शी व कार्तिक शु० ११ शी या दिवसांतील श्रीविठ्ठलमंदिरांत... उत्सव प्रेक्षणीय होतात. ...थेन

**वेताळ**—डिचोलीहून जवळ असणाऱ्या मुळगांव गांवा-तें देवालय असून येथील जत्रोत्सव प्रेक्षणीय असतो. ...लें. देवालयाशिवाय मुळगांवांत आणखीहि देवालयें आहेत. ...ळीं

**हनुमंत**---सांवर्डें रेलवे स्टेशनाच्या जवळ असणारी-'मनुमंत गड' नांवाच्या डोंगरीवर हें देवालय आहे. ...त चैत्रपौर्णिमोत्सव चांगला होतो. ...बा-

**शांतादुर्गा**---फोंडेंमहालांतील कवळें गांवांत व श्री... नाथ देवालयाजवळच श्रीशांतादुर्गेचें प्रसिद्ध व म... क देवालय आहे. या देवीची स्थापना प्रथम बंगाल... तिरहूत गांवीं करण्यांत आली होती. तेथून तिची गोवें वसविण्याच्या वेळीं गोव्यांत आलेल्या गौडसार-ब्राह्मणाकडून केळोशी (सासष्टी) येथें येऊन स्थापन करण्यांत आली; परंतु पुढें पोर्तुगिजांकडून हिंदूधर्मछलास सुरुवात झाली, तेव्हां श्रीशांतादुर्गेची मूर्ति कवळ्यास नेण्यांत आली व तूर्तच्या जागीं तिचें भव्य व प्रशस्त देवालय बांधण्यांत आलें. इतिहासप्रसिद्ध कै. नारोराम मंत्री यांच्या प्रयत्नानें इ. स. १७३९ त पेशवेसरकारांतून बऱ्याच उत्पन्नाची

